॥ वन्दे मातरम् ॥

१२४ अ व १५३ अ या कलमाखालीं आरोपी

# दे० शिवराम महादेव परांजपे यांच्या

## 'काळ' पत्रावरील

# राजद्रोहाचा खटला




## १९०८

[[illegible] लेख, सरकारी वकिलाचें भाषण, प्रो० परांजप्यांचें बचावाचें भाषण
० दावर यांचा समारोप, इ० संपूर्ण हकीकत ].

—संपादक व प्रकाशक—
वासुदेव विनायक साठे, बी. ए. (ऑनर),
३७ सदाशिव पेठ, पुणें शहर



[शके १८५९ ] किंमत चार आणे. [नोव्हेंबर १९३७.

# अनुक्रमणिका.



[ टीप—वैद्यपंचानन कृष्णशास्त्री कवडे यांनीं आपल्या 'लो० टिळ प्रो० परांजपे यांजवरील राजद्रोहाचे खटले' या जप्त उठलेल्या पुस्तक उपयोग करण्यास औदार्यानें परवानगी दिल्याबद्दल त्यांचे कृतज्ञताप आभार मानतों. —'सम्पादक'. ]

---


-मुद्रक-

लक्ष्मण सखाराम केळक

जनार्दन सदाशिव टि.चा प्रे

३९४ सदाशिव, पुणें २.


आप मार्कण्डो पर पोस्टी रसी जाय।
मगर सम्भव हो तो इसको तीन बैठों
रखी जा सकती है। पहले दिन रात को,
दूसरे दिन दोपहर के बाद और रात को।→

# काळकर्ते प्रो० शिवराम महादेव परांजपे

## यांजवरील

# राजद्रोहाचा खटला, १९०८.



११ जून १९०८ गुरुवार रोजीं पहाटे ४॥ वाजता मुंबईचे पोलीस इन्स्पे-क्टर मि० सुलेव्हान, पुण्याचे पोलीस सुपरिंटेंडंट, सिटी इन्स्पेक्टर, कांहीं गोरे [illegible]जेंट व बरेच हिंदी पोलीस यानीं पुण्यातील काळकचेरीला गराडा घातला. दे० [प]राजपे हे मुंबईच्या प्रे० मॅजिस्ट्रेटच्या सहीचें वॉरंट पाहताच पोलिसाच्या स्वाधीन [झा]ले. नंतर कचेरीची झडती घेऊन काळाच्या फायली, वर्गणीदाराचें रजिस्टर, [ह]स्तलिखित पुस्तकें, बिलबुकें वगैरे नेण्यात आलीं. त्याचप्रमाणे छापखान्याचीहि झडती [घे]ऊन कांही प्रुफें वगैरे नेण्यात आलीं. दे० परांजपे यास गाडींतून पोलीस [सु]परिंटेंडटच्या बंगल्यावर नेऊन दुपारीं ११॥ च्या गाडीने पहिल्या वर्गाच्या [रि]झर्व्ह डब्यांतून मुंबईस नेलें. दे० परांजपे रोजच्या पोषाखांत उल्हसित वृत्तीनें [व] स्मितवदनाने इ० सुलेव्हान यांशी बोलत बोलत, दुतर्फा उभे असलेल्या देश-[बां]धवांमधून स्टेशनबाहेर गेल्यावर चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट कोर्टातील पोलीस [चौ]कींत त्यास नेऊन ठेवण्यात आलें. दुसरे दिवशीं (१२ जून) चीफ प्रेसि-[डे]न्सी मॅजिस्ट्रेट ॲस्टन् यांजपुढें खटला सुरू झाला. पब्लिक प्रॉसिक्यूटर [इन्व]वेम सरकारतर्फे व दीक्षित आरोपींतर्फे काम चालवीत होते. मुंबईच्या [क्रि]मिनल इन्व्हेस्टिगेशन डिपार्टमेंटचे सुपरिंटेंडंट स्लोन यानीं आरोपींना [अट]ळखल्यावर सरकारी वकिलाच्या विनंतीवरून १५ जून सोमवारपर्यंत खटला [त]कूब करून परांजपे वाटेल तेवढ्या रकमेचा जामीन देण्यास तयार असूनहि [रा]जद्रोहाचा गुन्हा जामिनावर सोडण्यासारखा नाहीं या सबबीवर ॲस्टन् [सा]नीं जामीन-अर्ज फेटाळून लावला. पधरा दिवस परांजपे तापानें आजारी [अ]सल्यामुळें त्यांच्या औषधोपचाराची विशेष व्यवस्था ठेवावी असा कोर्टानें [हु]कूम द्यावा ही विनंतिहि सदर बाब तुरुंगाधिकाऱ्याच्या अधिकारातील आहे [या] सबबीवर अमान्य करण्यात आली! हायकोर्टाकडे अपील करण्यासाठीं

ॲस्टन यांच्या हुकुमाची नक्कल दीक्षितांनीं मागितल्यावरून देण्यांत आली. तावडतोब हायकोर्टांत चीफ जस्टिस स्कॉट् व जस्टिस नाइट् यांच्याकडे अपील दाखल करण्यांत आलें, सरकारतर्फे इन्व्हेरॅरिटी व ॲक्टिंग पब्लिक प्रॉसिक्यूटर बोवेन् आणि आरोपींतर्फे श्रोडसाच्या साह्यानें चॅमियर, काम चालवीत होते. आरोपीला आक्षित लेखाचीं सरकारी भाषांतरें मिळालेलीं नाहींत-वकिलांना योग्य सल्लामसलत देण्यासाठीं आरोपी तुरुंगाबाहेर असणें जरूर आहे, पंधरा दिवस तापानें आजारी असल्यामुळें आरोपीला तुरुंगात निष्कारण त्रास होईल, आरोपी एक लाख रुपयांपर्यंत जामीन देण्यास तयार आहे, असें अर्जांत व चॅमियर यांजकडून सांगण्यात आलें. लेख आरोपीनें स्वत: लिहून प्रसिद्ध केले असल्यामुळें त्याला भाषांतर देण्याची विशेषशी जरुरी नाहीं असें इन्व्हेरॅरिटी यानीं सांगितलें. तापानें आजारी असल्याबद्दल योग्य डॉक्टरचें सर्टिफिकिट दाखल करण्यांत आल्यास जामीन अर्जाचा फेरविचार होईल असें सांगून जामिनाचा अर्ज हायकोर्टानेंहि फेंटाळून लावला.

१५ जून १९०८ सोमवार रोजीं प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट कोर्टांत खटल्यास प्रारंभ झाला. बोवेन हे सरकारचे व बॅरिस्टर इद्रजित काळाभाई आणि एस्. एम्. दीक्षित हे आरोपीचे वकील होते. ओरिएंटल ट्रान्स्लेटर भास्कर विष्णु जोशी यांची साक्ष होऊन १५ मेचा काळाचा आक्षित लेख असलेला अंक, दहा वर्षे भाषांतराचें काम करीत असलेल्या जोश्यांनीं केलेलें आक्षित लेखाचें भाषांतर व फिर्याद करण्यास काद्री यांना सरकारकडून मिळालेलें अधिकार-पत्र, यांचा पुराव्यांत समावेश करण्यांत आला.

## १५ मे १९०८च्या काळांतील आक्षित लेख.

"बंगाल्यांतील बॉम्बगोळ्याच्या प्रकरणांतील आरोपी पकडण्याच्या कामीं ज्या लोकांनीं बहादरी केली आहे, त्यांच्या बक्षिसाची यादी प्रसिद्ध झाली आहे. तिच्यांतील कांहीं नांवें येणेंप्रमाणें आहेत:—सब इन्स्पेक्टर नंदलाल बानर्जी यांना एक हजार रुपये बक्षीस मिळालें, सब इन्स्पेक्टर चतुर्वेदी शर्मन यांना पांचशें रुपये देण्यांत आले आहेत. हेडकॉन्स्टेबल शमीर अहमदखान यांनाहि पांचशें रुपयांची बिदागी झाली. आणि ज्यांनीं खुदीराम बोस याला पकडलें असें शिवप्रसाद मिसर आणि फत्तेसिंग या नांवाचे जे दोन कॉन्स्टेबल

त्यापैकीं प्रत्येक इसमाला साडेबाराशे रुपयाचे इनाम देण्यात आले आहे. ही बक्षिसाची यादी वाचून मनामध्यें बरेच प्रश्न उद्भवतात. आतापर्यंत मुझफ्फरपुरच्या बॉवगोळ्याच्या प्रकरणासंबधाने जे लोक पकडण्यात आले आहेत, ते अद्यापि काहीं गुन्हेगार ठरलेले नाहींत; ते अजून आरोपी आहेत. त्याच्यावरील आरोप विश्वसनीय पुराव्यावरून न्यायाच्या कोर्टात अद्यापि शाबीत व्हावयाचे आहेत. असें असता पोलिसाना आधींच बक्षिसे वाटण्यात आलीं! येवढी घाई का? बानर्जी, शर्मन्, खान, मिसर आणि सिंग हे काहीं कोठें पळून जात नव्हते! खटल्याचा निकाल होऊन, त्यानीं जे आरोपी धरले तेच गुन्हेगार होते असे शाबीत झाल्यावर मग, या पोलीस इन्स्पेक्टराना आणि कॉनस्टेबलाना बक्षिसें देता आलीं नसती असे नाही. मग इतकी त्वरा कोणच्या हेतूसाठीं? आणि हीं बक्षिसे तरी कोणत्या कामगिरीसाठीं? पोलिसानीं धरलेले लोक हेच गुन्हेगार म्हणून कशावरून? पुष्कळ वेळा पोलिसाचे तर्क चुकतात. ते भलत्याच लोकाना गुन्हेगार म्हणून धरून आणतात आणि न्यायाची कोर्टें त्याना निरपराधी म्हणून सोडून देतात. अशा गोष्टी पोलिसाच्या साम्राज्यामध्यें हमेशा घडत असतात, हे अधिकाऱ्याना माहीत असता त्यानीं पोलिसाना बक्षिसें वाटण्याची इतकी अप्रशस्त घाई का केली? आरोपींनी कबुलीजबाब दिलेले आहेत, म्हणून तेच गुन्हेगार असले पाहिजेत, असें जर कोणी म्हणेल, तर तेंहि योग्य नाहीं. कारण पोलिसाचा मार चुकविण्यासाठीं पुष्कळ आरोपी पोलिसाजवळ ते म्हणतील तसा कबुलीजबाब देतात आणि न्यायाधिशापुढें तो पोलिसाच्या जबरीमुळें दिलेला जबाब सपशेल खोटा आहे असें सांगून जी खरी हकीकत असेल ती कळवितात. अशा स्थितींत पोलीस मॅजिस्ट्रेटच्यापुढें दिलेल्या जबान्यात काहीं एक अर्थ नसतो, हे कोणाच्याहि लक्षात येईल. आणि असें जर आहे, तर मग इतक्या लवकर आणि अपरिपक्व स्थितीमध्यें हीं बक्षिसे वाटून टाकण्यातील मतलब काय असावा? वरील बक्षिसाच्या रकमाची बेरीज साडेचार हजार रुपये होते. हे लोकाचे सार्वजनिक पैसे आहेत; आणि ते कशा रीतीनें खर्च केले गेले आहेत हें पाहणें हें लोकाचें काम आहे. आणि तशा दृष्टीनें पाहू लागल्यास हे आपले पैसे योग्य वेळेच्या आधीं आपल्या कामगाराकडून उधळले गेले असेंच त्याना वाटलें पाहिजे. तर मग योग्य वेळेच्या आधीं केलेल्या या उधळपट्टींतील गुप्त हेतु काय असावा?

दुसरी एक शंका अशी येते कीं, या बक्षिसांच्या यादींत सगळीं नावें नेटिव्हांचींच आहेत! राजकारणाच्या कामांत नेटिव्ह लोक म्हटले म्हणजे कुचकामाचे! त्यांच्या अंगात पात्रता अद्यापि यावयाची आहे. त्यांच्या हातून इतकीं महत्त्वाचीं कामें कसलीं होतात? त्यांच्यावर युरोपियन लोकांचीच देखरेख पाहिजे! अशी जर स्थिति आहे तर या बॉंब गोळ्याच्या प्रकरणासारख्या महत्त्वाच्या गुन्ह्याचा शोध लावण्याच्या कामात मुख्य पुढारीपणा गोऱ्या अधिकाऱ्यांकडे नसेल असें बिलकुल संभवावयाचेच नाहीं. त्यांचीच ही धूर्तता, हा चाणाक्षपणा आणि ही दूरदृष्टि असली पाहिजे.-असें असून बक्षिसाच्या यादींत त्या बिचाऱ्याचें नाव कोठेंच नाहीं. आणि सगळीं बक्षिसें नेटिव्हांनाच! गोऱ्या पोलिसांनीं गुन्ह्याचा तपास लावण्याकरितां आपलें डोकें शिणवावें आणि नेटिव्ह शिपायानीं बक्षिसें उपटावीं, हा निव्वळ अन्याय नव्हे काय? मग असें असता नेटिव्ह शिपायानाच बक्षिसें कां दिलीं? आणि तीं इतक्या लवकर कां दिलीं? ह्यात काहीं हेतु असेल काय? अक्कल व मेहनत स्वतःची आणि बक्षिसे नेटिव्हांना इतके गोरे लोक उदार कधीं झाले? आणि इतकी नेटिव्हांबद्दल सहानुभूति त्याना कधीं वाटूं लागली? पण कदाचित् असें तर नसेल ना? स्वदेशबंधुद्रोहाबद्दल तर हीं बक्षिसें नसतील ना? आणि पुढें असलीं सत्कृत्यें ज्यास्त करण्याला उमेद यावी आणि या प्रकरणांत अजून गुप्त राहिलेल्या गोष्टी लवकर उघडकीस याव्या म्हणून तर ही बक्षिसें देण्याची घाई नसेल ना? परंतु हा बंधुद्रोह होतो किंवा नाहीं याच्याबद्दल शंका उत्पन्न होणे संभाव्य आहे. या शंकेचा उलगडा करण्याकरितां दुसरीकडील एक उदाहरण आपण घेऊं या.

या आठवड्यात रूटरनें विलायतेहून हिंदुस्थानांत एक तार पाठविली आहे. त्या तारेंतील मजकूर असा आहे कीं, भूमध्यसमुद्रामध्ये माल्टा म्हणून जे बेट इंग्लिशाच्या ताब्यात आहे त्याच्या संरक्षणाकरितां सरकारनें ज्या गुप्त योजना केल्या आहेत त्यांबद्दल व्यापारी माहितीचे कागदपत्र एका इंग्रजी लष्करी अधिकाऱ्यानें एका परकीय सरकारला विकले असून जिब्राल्टरच्या सामुद्रधुनीसंबंधाचेहि गुप्त कागदपत्र तो विकण्याच्या बेतांत होता, इतक्यांत त्याला पकडण्यांत आलें. तसेंच समुद्राच्या पाण्याखालीं इंग्लिशाचीं संरक्षणाचीं साधनें कोणकोणतीं आणि कोठकोठें आहेत यावद्दलचे गुप्त कागद

नाहीसे झाले असून एका प्रधानाच्या ताब्यात असलेले महत्त्वाचे गुप्त कागद पसार झाले आहेत हे कागदपत्र परकीय सरकारच्या हाती पडल्यामुळे देशांत फार खळबळ उडून गेली आहे आणि आपल्या देशाच्या संबंधांची गुप्त रहस्यें जो कोणी दुसऱ्याला दाखवून देतो त्या दुष्ट, देशद्रोही आणि राजद्रोही इसमाला कडक शासन व्हावे म्हणून लार्ड मोरन यांनीं पार्लमेंट पुढे एक बिल स्वरूपानें बिल आणलें आहे व यासंबंधानें लिहिताना एका इंग्रजी पत्रकारानेंहि असें म्हटलें आहे की, 'A Traitor to his country deserves now if he ever did to be hanged drawn and quartered' हे उदाहरण आणि वरील उदाहरण यांच्या दरम्यान कांहीं कांहीं बाबतींत साम्य आहे परंतु एके ठिकाणी एकाला शासन होणार आहे आणि दुसऱ्या ठिकाणी दुसऱ्याना बक्षिसे मिळत आहेत, हा या दोन उदाहरणामध्ये मोठा फरक आहे वस्तुतः देशद्रोहाबद्दल सगळीकडे एकच शासन किंवा बक्षीस असलें पाहिजे परंतु हिंदुस्थानमध्यें हल्लीं जी विशिष्ट प्रकारची राज्यपद्धति चालू आहे, तिच्यामुळे हे फरक उत्पन्न होतात, हे कोणाच्याहि लक्षात येण्यासारखे आहे

नगरांगामध्यें या बॉम्बगोळ्याच्या प्रकरणासंबंधानें ज्या गोष्टी घडून आल्या आहेत त्या बऱ्या झाल्या किंवा वाईट झाल्या याच्याबद्दल मत प्रकट करण्या पूर्वी हल्लीं नगरांमध्ये मधून मधून कांहीं सभा होत आहेत पण मुझफ्फरपुर येथील बाॅम्बगोळा फेकण्याची क्रिया होऊन गेल्याला आज सुमार पंधरा दिवस झाले व इतके दिवस लोटल्यानंतर आता कोठें मधून मधून एकादुसरी सभा दुःख-प्रदर्शन करण्याकरता भरते, याचा सरकारनें काय अर्थ समजावा? या बाॅम्बगोळ्याच्या भडक्यानें चिडून जाऊन भलभलता आचरटपणा करण्याला प्रवृत्त होण्यापूर्वी लोकमताला आता आपल्याकडे कितपत पाठिंबा उरला आहे आणि जो थोडासा उरल्यासारखा वाटत आहे त्यावर आपण कितपत विश्वास ठेवावा, याबद्दल सरकारनें फार बारकाईनें विचार केला पाहिजे नाहीं तर हल्लीं उत्पन्न झालेल्या अनार्किस्ट लोकांना दाबून टाकण्यासाठी म्हणून कांहीं उपाय योजावे आणि त्या उपायांनीं चिडून जाऊन सगळ्या लोकांनीं सरकारवर उलटावे अशी दुर्धर स्थिति व्हावयाची! याकरता लोकमताचा सरकारनें शांतपणें विचार केला पाहिजे तें लोकमत काय दिसते?

बॉंबगोळे फेंकल्याला पंधरा दिवस होऊन गेले, तरी दुःखप्रदर्शनाच्या सगळ्य दोनचारच ठळक सभा होतात! यावरून या कामांत सुद्धां बहुजनसमाजाचें मत सरकारला फारसें अनुकूल आहे असें दिसत नाहीं. या पंधरा दिवसांत पंधर हजार दुःखप्रदर्शनांच्या सभा व्हावयास पाहिजे होत्या! पण त्या कोठें आहेत! आणि ज्या काहीं सभा झाल्या आहेत, तोहि जुलमाचाच रामराम असला पाहिजे असें दिसतें! तुम्ही सभा बोलावून दुःख–प्रदर्शन करा असें अधिकारी वर्गाकडून अप्रत्यक्ष रीतीनें सांगितलें जावें लागतें, तेव्हां कोठें कांहीं लोकांना दुःख होऊं लागतें! प्लँटर्सच्या सभेनें दुःख प्रदर्शित केलें आहे; पण ती युरोपियन लोकांचीच संस्था आहे! मुझफरपुर येथें ता. १० रोजीं दरभंग्याच्या महाराजाचे अध्यक्षतेखालीं अशीच एक दुःखप्रदर्शनाची सभा झाली. परंतु खुद्द मुझफरपुर येथेंहि सभा भरविण्याला दहा दिवस लागले, यावरून तिची खरी किंमत काय हें लोक ताडतात. मुझफरपुरच्या लोकांना खरें दुःख झालें असतें आणि त्यांना सरकारबद्दलहि खरी सहानुभूति वाटली असती तर खऱ्या दुःखाला आणि खऱ्या सहानुभूतीला दहा दिवसांचा अवकाश कधीहि सहन झाला नसता. दरभंग्याचे महाराज हे त्या सभेचे अध्यक्ष झाले होते. पण असल्या गोष्टींनाहि नेटिव्ह लोक अलीकडे फारसें महत्त्व देत नाहींत. सगळ्यांना माहीत झालेलें आहे कीं, हे राजे आणि महाराजे फार पराधीन झालेले असतात. त्यांना जशी मान हलवावयाला सांगितलेली असेल, तशी ते हलवितात! या स्थितीमुळें असल्या महाराजांच्या अध्यक्षतेखालीं झालेल्या गोष्टी म्हणजे निव्वळ बनावट फार्स अशी लोकांची समजूत होऊन गेलेली आहे. तेव्हां यांत तर खऱ्या दुःखाचा एकहि थेंब कोठें दिसत नाहीं. पुण्याच्या व बहारच्या मॉस्लेम लीगच्या मुसलमान लोकांनीं आणखी एक दुःखप्रदर्शनाचा समारंभ साजरा केल्याची बातमी प्रसिद्ध झाली आहे. परंतु मुसलमान लोक स्वकार्यसाधनाप्रीत्यर्थ वाह्यात्कारी इंग्लिशांच्या होस हो कसें ठेवून देतात याची ज्यांना माहिती नाहीं असे लोक आपल्या इकडे विरळाच सांपडतील. अशी या दुःखप्रदर्शनाची हकीकत आहे. तुम्ही आमच्यासाठीं थोडेसें तरी रडा, असें सांगितल्यानंतर मग दुःखप्रदर्शनाकरतां कोणाच्याहि अध्यक्षतेखालीं कोणत्याहि जातीच्या लोकांची आणि कितीहि मोठी सभा झाली, तरी सत्यत्वाच्या दृष्टीनें तिची किंमत कवडीइतकीहि

नाहीं तरी पण राजकारणाच्या दृष्टीनं आणि लोकामध्ये आपल्याबद्दल सहानुमति आहे असं भासविण्याच्या दृष्टीनें असल्या कृत्रिम दुःख प्रदर्शनाच्या सभाचीहि इंग्लिशाना अवश्यकता आहे पुण्यात मागे रँड साहेबाचा खून झा्‍ तेव्हाहि असेंच कोणी दु खप्रदर्शन करीना तव्हा गावातील सगळ्या प्रतिष्ठित लोकाना एका ठिकाणी जमवून तुम्ही दु खप्रदर्शन करा असं यथील त्या वेळच्या कलेक्टर साहेबाना सागणें भाग पडलें ! तसाच प्रकार बगाल्यात होत असला पाहिजे, असा पुष्कळाचा तर्क आहे पण असल्या बनावट लोकमताच्या मोठ्या सहानुभूतीवर ही इग्रजी राज्याची इमारत किती दिवस डुलत राहणार ? लोकमतात भयंकर अतर पडलें आहे अत्यत नम्र अर्जापासून बॉंब गोळ्यापर्यंत मजल येऊन ठेपली आहे व आम्ही हे गोळे आमच्यावर जुलूम करणाराचा सूड घेण्याकरिता आणि आमच्या देशाच्या स्वातत्र्याकरिता फेंकीत आहों, असें गोळे फेंकणारे लोक आपल्या तोडाने स्पष्ट म्हणत आहेत यावरून काय व्यक्त होतें ? सरकारबद्दलची भीति लोकाच्या मनावरून उडून गेली आहे या गोष्टीची निदर्शक अशी पुष्कळ प्रमाणे मिळतात तिनिवल्ली येथे जो खटला चालला आहे त्यातील एक मुख्य आरोपी सुब्रह्मण्य शिव, यानीं सरकारच्या न्यायकोर्टापुढ जो उघड उघड जबाब दिला आहे त्यावरून सुद्धा हीच गोष्ट सिद्ध होते मि० सुब्रह्मण्य शिव यानीं येणेंप्रमाणें आपला जबाब लिहून दिला आहे —"मी सन्यासी असून व्यक्तींनीं व राष्ट्रानें मोक्ष सपादन करावा असा उपदेश करीत असतों राष्ट्रीय मोक्ष म्हणजे परकीयाच्या सत्तेविरहित स्वातत्र्य होय बहिष्कार, नि शस्त्र प्रतिकार व राष्ट्रीय शिक्षण हे स्वातत्र्यसपादनाचे मार्ग होत विश्वासघात करून व भुरळ पाडून इग्रज सरकारने हिंदुस्थानचे राज्य सपादिल आहे महाराणीच्या जाहीरनाम्याने व निरनिराळ्या व्हाइसरायांना वेळोवेळीं दिलेल्या पोकळ पण गुळचट अभिवचनानीं लोकाना झुलविण्याचा प्रयत्न झाला आहे हल्ली लोकानीहि पुष्कळ चुका केलेल्या आहेत एकदर अनिष्ट परिस्थितीमुळें सरकार पालटलें पाहिजे अशी लोकाना अवश्यकता वाटू लागली आहे सबब त्याचेकडून स्वतत्र स्वराज्य स्थापन करण्याचा प्रयत्न होत आहे' असल्या जबाबानीं सरकारची उघड उघड बेअदबी होत आहे ! सरकारचा वरचष्मा यानें उतरत आहे ! हा सरकारी सत्तेचा अपमान आहे ! आणि हा सरकारी सामर्थ्याचा

उपमर्द आहे! आणि शिवाय लोकांमध्यें असल्या जबाबाची तारीफ करण्याची प्रवृत्ति वाढत चाललेली आहे! तेव्हां या सगळ्याचा अर्थ काय होतो? लोकमत सरकारच्या बाजूला असावें तितकें नाहीं, हें यावरून उघड उघड होत आहे. आणि म्हणून सरकारला आमची अशी नम्र विनंति आहे कीं त्यांनीं या नाजूक प्रसंगीं भलतींच आचरटपणाचीं कृत्यें करून लोकांना चिडवूं नये. लोकांच्या कलानें त्यांनीं वागलें पाहिजे. त्यांच्या कलानें लोकांनीं वागण्याचे दिवस आता उरले नाहींत! लोकांचे हक्क लोकांना पाहिजे आहेत; आणि ते सरळ मार्गानें मिळाले नाहींत, तर वाकड्या मार्गानें मिळविण्याची लोकांची तयारी दिसूं लागली आहे. हें जाणून स्वराज्यासारखे महत्त्वाचे हक्क देऊन इंग्लिशांनीं लोकांना खुष करावें, हेंच अशा वेळीं उचित आहे.

मात्र असें झालें नाहीं, तर शक्तीच्या परीक्षेची वेळ लवकरच येण्याचा फार संभव आहे. लोकांच्या भाषेमध्यें आणि विचारामध्यें महदंतर पडलें आहे. "इंग्रजी राज्यापासून आमचे अतिशय फायदे झाले आहेत" आणि "इंग्रजी राज्य देवानें आमच्यावर पाठविलें आहे," असलीं वाक्यें बोलणारे आता फारच थोडे लोक राहिले आहेत. हल्लींची भाषा "आम्हांला स्वराज्य पाहिजे" आणि "स्वराज्याच्या प्राप्तीसाठीं आम्ही वाटेल तें करूं," अशी झाली आहे. सारांश, मनातील दहशतीचा प्रश्न उरलेला नाहीं; बाहेरच्या शक्तीच्या दडपणाचा मात्र प्रश्न राहिला आहे, असा याचा अर्थ होतो. पण ही स्थिति चांगली नव्हे. आणि ती लोकांना खुष ठेवून इंग्लिशांनीं होईल तितक्या लवकर नाहींशी करावी, हें उत्तम होय. रशियामध्यें बॉंबगोळे फेंकतात, आणि इंडियामध्येंहि आतां बॉंबगोळे फेंकूं लागले आहेत. पण या दोन देशांतील स्थितीमध्यें फरक आहे. रशियामध्यें रशियन सरकारच राज्य करीत आहे. त्या सरकारविरुद्ध जे अनार्किस्ट लोक उठतील त्यांच्याविरुद्ध आणि सरकारच्या अनुकूल, अंतःकरणपूर्वक असणारे लोक रशियामध्यें पुष्कळ असल्यामुळें तेथील सरकारला तितका नैतिक आधार सांपडतो. परंतु हिंदुस्थानांत तितके अनुकूल लोक सांपडतील किंवा नाहीं याच्याबद्दल सद्यःस्थितीमध्यें वानवाच दिसत आहे. असें असूनहि जर रशियामध्यें बॉंबगोळ्यांच्या पाठीमागून ड्यूमा सभा आली, तर मग हिंदुस्थानांतील लोकांना स्वराज्य मिळणें हें तर ज्यास्तच अवश्यक आहे. स्वराज्यापेक्षां कमी दर्जाच्या देणगीनें हिंदुस्थानां-

तील लोक काहीं वर्षांपूर्वी तृप्त झाले असते. परंतु तो पूर्वीचा विश्वास आज उडून गेलेला असल्यामुळे स्वराज्याच्या हक्काशिवाय दुसऱ्या कशानेंहि लोकांचें समाधान होईल असा संभव दिसत नाहीं.

हल्लीं हिंदुस्थानात प्राप्त झालेल्या स्थितीला स्वराज्याच्या हक्काशिवाय दुसरें औषध नाहीं, असें सामान्य लोकांचेच मत आहे असे नाहीं, तर सरकारच्या विश्वासातील जे मि० दत्त आणि ज्याना सरकारनें स्टेट सेक्रेटरीच्या कौन्सिलमध्यें सल्ला घेण्याकरिता नेमले आहे, त्यांचेहि असेंच मत आहे. हिंदुस्थानात अनार्किस्ट लोकांची धादल लवकरच सुरू होणार असे आपण भविष्य केलेंच होतें, असें मि० रमेशचंद्र दत्त हल्लीं म्हणत आहेत ! लोकांच्या तक्रारीकडे सरकार योग्य लक्ष देत नाहीं अशी हिंदुस्थानातील लोकांची दिवसेंदिवस ठाम समजूत होत चालल्यामुळें असले बॉबगोळ्यासारखे प्रकार घडून येत आहेत व स्वराज्याच्यासारखे महत्त्वाचे हक्क लोकाना मिळाल्यावाचून असले प्रकार बंद व्हावयाचे नाहींत, असें त्यांचें मत आहे. या आपल्या सल्लागाराच्या सल्ल्याकडे मोर्लेसाहेब आपलें लक्ष पुरवितील, तर मि० दत्त याना त्यांनीं आपल्या कौन्सिलमध्यें नेमल्याचें काहीं तरीं चीज होईल. स्वराज्यप्राप्ति हा जो हिंदुस्थानातील राजकीय चळवळीचा उद्दिष्ट हेतु त्या दृष्टीने पाहिले तर आपल्याइकडील बॉब गोळे फेकणारासा देखील अनार्किस्ट हा शब्द लावणें अन्यायाचें आहे. ते खरोखर अनार्किस्ट नाहींत व त्याना कोणी अनार्किस्ट म्हणूंहि नये. अनार्किस्ट म्हणजे अराजक स्थिति उत्पन्न करावी असा ज्याचा उद्देश असेल तो होय. पण आपल्याइकडील बरेन बाबूसारख्या लोकांची इच्छा हिंदुस्थानात कोणतेंहि राज्य नसावें आणि जिकडे तिकडे अराजकत्वाची अथवा बेबंदपादशाहीची स्थिति सुरू व्हावी अशी मुळींच नाहीं. त्याना अराजक स्थिति नको असून स्वराज्याची स्थिति पाहिजे आहे. तेव्हा त्याच्याकरितां अनार्किस्ट हा शब्द योग्य नसून आपल्या देशाला स्वराज्य देणारा अशा अर्थाचा जर काहीं एकादा शब्द इंग्रजी भाषेमध्यें असेल, तर तो त्याना योग्य आहे. बॉब गोळे फेंकणें हे चागले किंवा वाईट हा प्रश्न अलाहिदा ठेविला असता येवढें निर्विवाद आहे कीं, इंडियन लोक अराजकत्वाकरिता नव्हे, तर स्वराज्याकरिता खटपटी करीत आहेत !

दुःस्वप्रदर्शनाच्या ज्या सभाचा वर उल्लेख केला आहे त्याच्याशिवाय

डाका, माणिकगंज, मुर्शिदाबाद येथेंहि मागाहून सभा झाल्याची बातमी आली आहे. व या सभांतून आणखी असाहि एक ठराव पास करून घेण्यांत आला आहे कीं, या अनार्किस्ट चळवळी देशामध्यें सुरू झाल्या आहेत त्या दाबून टाकण्याकरितां सरकारनें नेटानें प्रयत्न करावा. दरभंग्याच्या महाराजांच्या अध्यक्षतेखालीं झालेल्या सभेमध्यें असें प्रतिपादन करण्यांत आलें आहे कीं, वर्तमानपत्रें व व्याख्यानें याच्या योगानें लोकाचीं मनें बिथरतात याकरिता असल्या प्रकारचे लेख आणि भाषणें बंद करण्याविषयीं तजवीज करावी. एके ठिकाणीं तर असा स्पष्ट उल्लेख आहे कीं, बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी आणि बाबू बिपिन चंद्र पाल याच्यासारख्याच्या भाषणांनीं असे परिणाम घडून येतात. व या सगळ्याचा बंदोबस्त व्हावा अशा सरकारकडे शिफारशी चाललेल्या आहेत. तूर्त या चहाडबुचक्या आणि तोंडपुज्या लोकाकडून सरकारवर असल्या वेडगळ सूचनांचा जो वर्षाव होत आहे त्यातील गाळसाळ काढून टाकून त्यातील ग्राह्यांशाचा बिंदु काय आहे तें समजून घेण्यासाठीं सरकारला एक निराळें खातेंच ठेवावें लागेल अशी भीति आहे! तसेंच आपण सरकारला या प्रसंगीं काय मदत करावी याचा विचार करण्यामध्यें युरोपियन डिफेन्स असोसिएशन ही संस्था गढून गेलेली आहे. पण आम्ही असें विचारतों कीं, हे दरभंग्याचे महाराज, ही प्लँटर्स असोसिएशन, ही बिहार मॉस्लेम लीग, किंवा ही युरोपियन डिफेन्स असोसिएशन, या सगळ्या संस्था इतके दिवस कोठें गेल्या होत्या? हल्लीं जे भयंकर प्रकार घडून आले त्याचीं अनेक कारणें हळूहळू एकत्र गोळा होत होतीं, तेव्हां या संस्था व हे महाराजे काय झोंपीं गेले होते? तेव्हा यांनीं इंग्रजी अधिकारीवर्गाला सांगावयाला पाहिजे होतें कीं, बाबांनो, लोकाना तुम्ही इतकें सतावून सोडूं नका! आतां एकदां गोळा उडून गेल्यावर मग सरकारला आगींत तेल ओतण्याचा सल्ला देण्यांत कांहीं शहाणपणा नाहीं. जेव्हां हिंदुस्थानातील अगणित पैसे बिलायतेस पाठविले जातात, जेव्हा नेटिव्हांना वरिष्ठ जागा मिळत नाहींत, जेव्हां कॉंग्रेसच्या बावीस वर्षांच्या अरण्यरुदनांकडे कोणीं ढुंकून सुद्धा पाहिलें नाहीं, जेव्हां इंडियन लोकांच्या छातीवरून दिल्लीस हत्तींच्या मिरवणुकी काढल्या, जेव्हां लाखो बंगाली लोकांच्या अत्यंत नम्र विनंत्यांना न जुमानतां बंगालची फाळणी करण्यांत आली, जेव्हां लाला लजपतराय आणि सरदार अजितसिंग यांना

चोकशीवाचून शिक्षा देण्यात आल्या, जेव्हा सभाबंदीचा कायदा जबर दस्तीनं पास करून घेण्यात आला, त्या वेळा—त्या अनेक वेळांपैकी एका वेळी तरी—या सरदारांपैकीं किंवा महाराजांपैकीं एखाद तरी पुढें येऊन सरकारला असं सांगितलें काय कीं, तुम्ही हीं वाईट कृत्यें करीत आहां, त्याचा वाईट परिणाम तुम्हाला भोगावा लागल, त्यासाठीं ती तुम्ही करू नका ? युरोपियन डिफेन्स असोसिएशनला जर युरोपियन लोकांचे खरोखर सरक्षण व्हावे असे वाटत असेल, तर त्याला एकच मार्ग आहे आणि तो हिंदुस्थानातील लोकांच्या मागण्या कबूल करणें हा होय परतु असं न होईल, तर युरोपियन डिफेन्स असोसिएशन-ऐवजीं युरोपियन डिफीट असोसिएशन असं तिचं नाव भावी इतिहासाला बदलावे लागल "

काळ, मुद्रक व प्रकाशक प्रो० शिवराम महादेव परांजपे, वार्षिक वर्गणी दोन रुपये, या साप्ताहिकाचे मुंबईस ६५० अंक जात, अशी माहिती दाखल झाल्यावर गुन्हा शाबीत झाल्यास प्रेसिडन्सी मॅजिस्ट्रेट कोर्टास ज्यास्तींत ज्यास्त जितकी शिक्षा देता येईल ती गुन्ह्याच्या मानानें अपुरी असल्यामुळे खटला सेशन-कमिट करावा असे सरकारी वकील रोबेन यानीं सांगितले, आरोपीतर्फे बॅरिस्टर इंद्रजित यानीही लेखाची भाषा प्रौढ मराठी असल्यामुळे ज्यूरीपुढे त्याचा विचार झालला बरा असं सांगितलें मॅजिस्ट्रेट ॲस्टन् यानाहि १ जुलै-पासून रजेवर जावयाचें होतें तोंवर खटला आटपणें शक्य नसल्यामुळ त्यानीं खटला सेशन-कमिट केला

बचावाच्या तयारीसाठीं आरोपीस जामिनावर सोडाव असा अर्ज २० जून १९०८ रोजी हायकोर्टात न्या० दावर याजपुढें करण्यात आल्यावरून साडे सात साडेसात हजाराचे दोन जामीन व दहा हजाराचा जातमुचलका घेऊन दे० परांजपे यास जामिनावर सोडण्यात आले

ता २७ जून १९०८ शनिवार रोजीं न्या० दावर याच्यापुढें खटला सुरू झाला गर्दी खूप होती सरकारतर्फे ॲडव्होकेट जनरल ब्रॅन्सन, रॅ० इन्व्हेरॅरिटी व निनिंग आणि आरोपीतर्फे रॅ० जिना काम चालवीत होते लेखाची भाषा प्रौढ असल्यामुळें स्पेशल ज्यूरी नेमावी अशी ब्रॅन्सन यानीं विनंति केली पण स्पेशल ज्यूरींत मराठी भाषा न समजणाऱ्या युरोपियनांचा भरणा अधिक असतो या मुद्द्यावर जिनांनीं हरकत घेतली, मात्र युरोपियन लोकांच्या शीला

संबंधानें आक्षेप घेण्याचा आपला इरादा नाहीं असा खुलासा केला. पण कोर्टास क्रि० प्रो० कोडच्या २७६व्या कलमाप्रमाणें स्पेशल ज्यूरी नेमतां येते, ज्यूरीला मराठी भाषा आलीच पाहिजे असें काहीं नाहीं, आक्षिप्त लेखाचें इंग्रजी भाषांतर आहेच, कोर्टाचें कामहि इंग्रजींतच चालतें व खटला महत्त्वाचा आहे अशीं कारणें देऊन न्या० दावर यानीं स्पेशल ज्यूरी नेमण्यास परवानगी दिली, पुढील तारीख ६ जुलै १९०८ ही नेमली व दे० परांजप्यांची पूर्वीच्याच जामिनावर मुक्तता केली.

सोमवार ६ जुलै १९०८ रोजीं मुंबई हायकोर्टाच्या तिसऱ्या फौजदारी सेशनात फिर्यादी, बादशहा सातवे एडवर्ड वि० आरोपी, शिवराम महादेव परांजपे या खटल्यास सुरुवात झाली. सरकारतर्फे ॲक्टिंग प्रॉसिक्यूटर व सरकारी सॉलिसिटर बोवेन, विनिंग, इन्व्हेरॅरिटी व ॲडव्होकेट जनरल ब्रॅन्सन् हे काम चालवीत होते. परांजप्यानीं वकील दिला नव्हता. ते स्वतःच काम चालवीत होते. परांजप्यांवर १२४ अ कलमाखालीं राजद्रोहाचा व १५३ अ कलमाखालीं जातीजातींत वैमनस्य उत्पन्न करण्याचा असे आरोप ठेवण्यांत आले होते. न्यायाधीश फार अंतरावर असल्यामुळें आरोपीच्या नेहमींच्या जागेवरून उठून वकील मंडळींत बसण्याची परवानगी दे० परांजपे यांस ऐकणें सुलभ होण्यासाठीं देण्यात आली. कोर्टाच्या चारी बाजूंच्या रस्त्याची पोलिसानीं नाकेबंदी केली असूनहि कोर्टांत खटला ऐकण्यास खूप गर्दी झाली होती. काहीं युरोपियन स्त्रियाहि हजर होत्या. स्पेशल ज्यूरींतील नऊ गृहस्थः— फोअरमन जॉर्ज एच्. मॅकॉसलंड, महमद युसफ, एल. डब्ल्यू. मायकेल, हर्बर्ट जी. क्लार्क, सोराबजी डी. दुभाष, ए. जे. बिलिमोरिया, हैदरअल्ली इ. दुभाष, जे. एम. मेयर व पोचाजी बी. दुभाष. काळाच्या २० मार्च, २९ मे व ५ जून या तीन अंकांतील लेखाचीं भाषांतरें पुराव्यांत आणखी दाखल करण्यात आलीं. मात्र आरोपीतर्फे वकील देण्यात आला नसल्यामुळें योग्य क्रमानुसार हे लेख कोर्टापुढें येण्याआधीं त्याचा उल्लेख करण्यांत येऊं नये असें कोर्टानें सांगितलें व ब्रॅन्सननीं तें मान्य केलें.

**ॲडव्होकेट जनरल ब्रॅन्सन यांचें अडीच तास प्रास्ताविक भाषण.**

वाचतांच लक्षात येईल इतका उघड राजद्रोह लेखांत भरला असल्यामुळें आरोपी सुज्ञ असल्यास त्यानीं लेखांत राजद्रोह नाहीं असें कोर्टाच्या मनात

भरविण्याच्या नादात पडू नये असा इशारा देऊन ब्रॅन्सननीं सांगितलें कीं, काळ पत्र पुण्यास कसबा पेठत मनोहर छापखान्यांत छापण्यात येतें हें लेख आरोपीच्या माहितीशिवाय व इच्छेविरुद्ध छापण्यांत आले असें सिद्ध झाल्या शिवाय त्याच्यावरील जबाबदारी चुकत नाहीं एकादा लेख आपल्या पर वानगीशिवाय छापल्याच्या सबबीवर कायद्याच्या कचाटींतून निसटून जाण्यास लेखकास कायद्याचा प्रतिबंध असला पाहिजे नाहीं तर कायद्याचा जोर राहणार नाहीं असें करण्यास कायद्याचा आधारहि आहे परदेशी वृत्तपत्रातील उतारा प्रसिद्ध करण्याबद्दलहि प्रकाशकास जबाबदार धरण्यात येतें मग खुद्द आरोपीनें लिहिलेल्या लेखाबद्दल तर त्याला जबाबदार धरलेच पाहिजे

यानंतर १२४ अ व १५३ अ या कलमाच्या नकला ज्यूरसना कार्गच्या पर वानगीने देऊन मागें या कलमाचा इतर्नी कायद्याप्रमाणे अर्थ लावण्याचा प्रयत्न झाला होता तो, इंग्लंडचा कायदा हिंदुस्थानात आणणें युक्त नव्हे या मुद्द्यावर गैर ठरवून, त्याची न्यायमूर्तीनीं समारोपात घेतला व प्रिव्ही कौन्सिलच्या न्याया धीशाना गैर न वाटलेला १२४ अ या कलमाचा अर्थ खरा मानला पाहिजे असें ब्रॅन्सन म्हणाले वगैरांशी पत्रावरील खटल्यात अप्रीति म्हणजे प्रीतीचा अभाव असा जस्टिस् पर्थेरेम यानीं केलेला अर्थ दुरुस्त करून त्याची यानीं प्रीतीचा अभाव म्हणजेच अप्रीति नव्हे, अप्रीति म्हणजे उघड व स्पष्ट द्वेष असा अर्थ लावला, असे सांगून संपादकास त्याच्या मनातील अर्थावरून शिक्षा होत नाहीं तर त्याच्या लेखाच्या साहजिक अर्थावरून होणें व झाली पाहिजे, लेखाचा अर्थ करणारे तुम्ही ज्यूरी आहा व तो करताना लेख केव्हा, कोठें, कोणा साठीं व कोणत्या परिस्थितींत लिहिण्यात आले याचाहि विचार झाला पाहिजे असें ब्रॅन्सननीं सांगितलें ते पुढे म्हणाले, हे लेख मुंबईतल्यासारख्या सुशिक्षितां साठीं लिहिलेले नसून पुण्याच्या व पुण्याच्या आसपासच्या लोकांसाठीं, सरकार लोकांवर फार जुलूम करीत आहे असा ग्रह उत्पन्न करण्याच्या हेतूनें, लिहि लेले आहेत कायद्यानुसार गुन्हा होण्याला अप्रीति उत्पन्न झालीच पाहिजे असें नाहीं अप्रीति उत्पन्न करण्याचा प्रयत्नहि (तो यशस्वी होवो अगर न होवो) पुरा सरकारबद्दल लोकांचा चांगला ग्रह असल्यामुळें अप्रीति उत्पन्न न झाली तरी दोषमुक्तता होऊं शकत नाहीं लोकांना लढे अगर मारामारी करण्यास प्रवृत्त करणारे लेखच तेवढे दोषार्ह असेहि नव्हे टीकाविषय झालेली

जुलमी कृत्यें खरोखरींच सरकारनें केलेलीं असलीं तरीहि अप्रीति उत्पन्न करण्याचा गुन्हा मुळींच कमी होत नाहीं असें जेंकिन्सप्रभृति न्यायाधीशांचें मत आहे; या लेखानीं सरकारबद्दल गैरसमज खात्रीनें उत्पन्न होईल; यांतील भाषेमुळें सरकारविरुद्ध अप्रीति व बेदिली उत्पन्न झालीच पाहिजे; इंग्रजी व हिंदी कायद्यांतील बारीकसारीक फेरफारांमुळें ज्यूररसनीं गैरसमज करून घेऊं नये; भाषण–स्वातंत्र्याला व लेखन–स्वातंत्र्याला घालून दिलेल्या मर्यादांचें अतिक्रमण केव्हा होतें हें या कलमाच्या टीकेंत सांगितलें आहे; अप्रीति कमी अधिक उत्पन्न होईल तदनुसार फार फार तर शिक्षा कमी अधिक द्यावी; कडक टीकेमुळें गुन्हा घडत नसला तरी सरकारचें एकंदर धोरणच जुलमी आहे असें ध्वनित करण्यांत आल्यास अगर सरकारच्या अस्तित्वावरच घाव आल्यास गुन्हा घडतो; लेखामुळें होणाऱ्या परिणामावरून लेखकाचा हेतु ताडला पाहिजे; लेखक कांगावा करील तोच उद्देश मानतां कामा नये; इंग्लंडांत ज्यांमुळें बेदिली उत्पन्न होणार नाहीं त्या लेखांमुळें हिंदुस्थानांतहि होणार नाहीं असें नव्हे; माझ्या या सर्व मुद्द्यांना स्ट्राची साहेबांच्या उपरिनिर्दिष्ट भाषणांतील प्रत्येक शब्द पुष्टिकारक आहे. यानंतर ब्रॅन्सननीं आक्षित लेखाच्या इंग्रजी भाषांतराच्या प्रती ज्यूररसना देऊन विशेष महत्त्वाचीं वाक्यें वाचून दाखविलीं. नंतर ते म्हणाले, कलकत्यास युरोपियन पोलीस अधिकाऱ्यांना बक्षिसें न देतां फक्त नेटिव्हांना देण्यांत त्यांनीं स्वदेशबांधवांचा हवा तसा विश्वासघात करावा असें शिकविण्याचा सरकारचा उद्देश होता, बॉंब प्रकरणांतील गुन्हेगार पकडण्याची नेटिव्ह पोलीस अधिकाऱ्यांची चलाखी म्हणजे स्वदेशबंधूंचा विश्वासघात, जिब्राल्टर व माल्टा या ठिकाणांचे नकाशे विकल्याबद्दल हेराना शिक्षा करणारें इंग्रज सरकार हिंदुस्थानांत नेटिव्हांचा विश्वासघात करण्याबद्दल नेटिव्ह पोलीस अधिकाऱ्यांना बक्षिसें वाटतें, कलकत्याकडील बॉंब प्रकरणासंबंधीं राग व्यक्त करणाऱ्या पुष्कळ खोट्या सभा सरकारनें आपल्या बगलबच्चांकडून भरविल्या, बॉंबनें मुझफरपुरास घडलेल्या खुनाबद्दल दुःख व्यक्त करण्याचें हिंदी लोकांना मुळींच कारण नाहीं, असे मुद्दे या लेखांत असून रशियननांनीं बॉंबच्या जोरावर ड्यूमा सभा मिळविली त्याप्रमाणें स्वराज्य न दिल्यास तें मिळविण्यासाठीं हिंदी लोकहि बॉंब गोळ्यांचा उपयोग करतील अशी धमकी सरकारला दिली आहे व रँडच्या खुनाचा उल्लेख करून असल्या दांडलेल्या

पायावर इंग्रजी राज्य किती दिवस डळमळत राहणार असा सवाल आरो पींनें केला आहे व आपल्या मताला दत्ताच्या म्हणण्याचा आधार दिला आहे. दत्तानीं याबद्दल आरोपीवर अब्रुनुकसानीची फिर्याद यापूर्वी केली नसल्यास अजून तरी जरूर करावी अशीहि शिफारस ब्रॅन्सननीं जाता जाता केली व लेखातील शब्दनुशब्द १२४ अ कल्मासालीं येत आहे असे सांगितलें. नारायण नरसो केळकर यानी काळाच्या ६५० प्रती दर आठवड्यास आप णाकडे येतात असें आपल्या साक्षींत सांगितलें.

मग्तर दे० परांजपे यानीं जबाब दिला, त्यात काळात प्रसिद्ध होणाऱ्या सर्व मजकुराची जबाबदारी त्यानीं पत्करली व स्वदेशबांधवाची स्थिति सुधारण्यास यथाशक्ति मदत करण्याच्या हेतूनें आपण काळ पत्र काढलें, लेखातील आपली मते कायम असून त्याच्या प्रसिद्धीमुळे ब्रिटिश इंडियातील कोणत्याहि कायद्याचें आपण उल्लंघन केले आहे असें आपणास केव्हाहि वाटलें नाहीं व अजूनहि वाटत नाही, अधिकाऱ्याच्या काही कृत्यावर टीका करण्यासाठीं व आठवड्यात घडलेल्या गोष्टींसबंधी लोकमत प्रकट करण्याकरता आपण ते लेख लिहिले, कलकत्त्याच्या पोलिसाना बक्षिसें वाटण्यात सरकारचा बराच अविचार झाला असें आपले लेख लिहिल्यावेळचें मत अजूनहि कायम आहे, बॉबबद्दल नापसती दाखविणाऱ्या सभाविरुद्ध लिहिण्याचा उद्देश अशा सभा तून दडपशाही सुरू ठेवण्याबद्दल सरकारला करण्यात येणाऱ्या अनर्थमूलक सूचनाकडे सरकारनें मुळींच लक्ष देऊ नये असें सुचविण्याचा होता, हिंदुस्थानभर पैलावलेला असतोष राजकीय हक्क लोकाना मिळेपर्यंत शांत होणार नाही हे आपलें लेखातील मत अजूनहि तसेच कायम आहे, इतर मुद्दे गौण व वरील सिद्धान्ताना पुष्टि देण्यासाठीं मांडले आहेत, सरकारी अधिकाऱ्या वरील टीका फक्त त्याच्या दुष्कृत्याना उद्देशून केली असल्यामुळें जातीजातींत वैमनस्य येण्याचें कारणच नाहीं व म्हणून आपणास दोन्ही आरोपातून निर्दोष ठरवावें असें सांगितलें.

मगळवारीं ब्रॅन्सन यानीं ज्यूरीला उद्देशून केलेल्या भाषणात सांगितलें कीं, हिंदुस्थानात बॉब येण्यास मूळ इंग्रजच कारण झाले या आरोपीच्या विधाना मुळें युरोपियन लोक व सरकार याबद्दल लोकात तिरस्कार उत्पन्न होऊन नेटिव्ह व युरोपियन यात वितुष्ट येईल, १५ मेच्या लेखातील उताऱ्यावरून इंग्रज

सरकार रशियन सरकारइतकेंच नव्हे तर ज्यास्त जुलमी असल्यामुळें रशियनांप्रमाणें हिंदी लोकांनीहि बॉबचा उपयोग करावा असें आरोपीचें मत आहेसें दिसतें, पूर्वी हिंदी विद्यार्थी बॅरिस्टर होण्यासाठीं विलायतेस जात तर हल्लीं बॉबची कृति शिकण्यासाठीं जातात असा उल्लेख, सरकार हिंदी लोकांच्या हिताविरुद्ध वागतें असा आरोप व इंग्रज हिंदुस्थानांत आल्यामुळें प्लेग, दुष्काळ व दारिद्र्य ही संकटें हिंदुस्थानांत शिरलीं हें विधान, १२४ अ व १५३ अ या दोन्ही कलमाखालीं लेख आक्षेपार्ह ठरविण्यास पुरेशीं आहेत. आरोपीनें वकील दिलेला नाहीं या सबबीवर वाटेल तीं प्रश्नोत्तरें उत्पन्न करून कोर्टाला राजकीय वादविवादक मंडळीचें स्वरूप न येऊं देण्याची खबरदारी घेण्याबद्दल कोर्टाला विनंति करून ब्रॅन्सननीं आपलें भाषण संपविलें.

## प्रो० शिवराम महादेव परांजपे यांचें बचावाचें भाषण.

जज्जसाहेब आणि ज्यूरीमधील सभ्य गृहस्थहो, हें न्यायाचें कोर्ट आहे आणि येथूनच मला न्याय मिळावयाचा आहे ही गोष्ट माझ्या पूर्णपणें लक्षात आहे. ती सांगण्याची जरुरी ॲडव्होकेट जनरल यांना बिलकुल नव्हती. कोर्ट ही वादविवाद करणारी मंडळी नाहीं हे मी जाणतों. मीं आपल्यातर्फे कोणी वकील दिला नाहीं, याचें कारण माझ्यावर सरकारकडून राजद्रोहाचा आरोप ठेवण्यांत येणार नाहीं असें मला वाटलें, हें नव्हे; सरकार माझ्यावर राजद्रोहाचा आरोप ठेवणार हें मी जाणून होतों. मी कांहीं वकील नाहीं; मी मुंबई युनिव्हर्सिटीचा एक एम्. ए. आहे. आणि ज्याप्रमाणें आपण सद्गृहस्थ आहां, त्याप्रमाणें मीहि एक सद्गृहस्थ आहें. जरी या राजद्रोहाच्या खटल्यांत कायद्याचा पुष्कळ संबंध आहे तरी सरकारतर्फेच्या पुराव्याची भिस्त सर्वस्वीं माझ्या लेखावरच आहे आणि ते लेख मीं स्वतः लिहिले असल्यामुळें त्यांचें इद्गत माझ्याइतकें स्पष्ट दुसऱ्या कोणालाहि सांगतां येणार नाहीं; आणि म्हणूनच मीं वकील दिला नाहीं. असें बोलण्यामध्यें कोणत्याहि बॅरिस्टराचा किंवा कायद्यांमधील वाकबगाराचा अपमान करण्याचा माझा हेतु नाहीं. मला आपला खटला जरूर तितका कोर्टापुढें मांडतां येईल अशी माझी पक्की खात्री आहे.

राजद्रोहाचे दोन भाग करण्यांत येतात. एक कायद्याचा आणि दुसरा वस्तुस्थितीचा. आणि मी आपल्या भाषणांत फक्त वस्तुस्थितीच्या दृष्टीनें

विचार करणार आहे. कायद्याचे विवेचन करण्याचे काम मी ज्जसाहेबावर सोपवितो. ज्जसाहेबावर माझा पूर्ण भरवसा आहे. ज्जसाहेब हे सरकारच्या पक्षाचे नाहीत व आरोपीच्या पक्षाचेहि नाहीत. त्याच्या न्यायाचा निकाल निःपक्षपातीपणाने झाला पाहिजे. त्या न्यायावर माझा पूर्ण भरवसा आहे आणि जो मला आणि माझ्या देशाला अवश्य आहे असाच न्याय ज्जसाहेबाकडून मिळेल अशी माझी खात्री आहे. प्रथमतः अशा तऱ्हेचे उद्गार काढण्याची माझी इच्छा नव्हती. परंतु ॲडव्होकेट जनरलनीं नुकतेच जे उद्गार काढिले त्यावरून असे उद्गार काढण्याची अवश्यकता भासू लागली आणि म्हणूनच तसें करून कायद्याचे विवेचन मी ज्जसाहेबावर सोपवितो. ते आपल्याला कायदा विशद रीतीनें समजावून सांगतील.

आता मला परिस्थितीसंबधानें चार शब्द सांगावयाचे आहेत. ज्या माझ्या लेखावरून फिर्याद करण्यात आली आहे ते लेख आपणापुढे आहेत. ॲडव्होकेट जनरलप्रमाणेच मीहि आपणाला विनंति करितो कीं, हे लेख आपण समग्र वाचून पाहा. लेखामधील सरकारतर्फे पुढें मांडलेलीं तुटक तुटक वाक्यें आपण वाचू नका; समग्र लेख वाचून पाहा. कोर्टामध्यें दाखल केलेले चार लेख आहेत. ते आपण सर्व वाचून पाहा आणि वाचल्यानंतर बाजूला ठेवून द्या आणि मग स्वतंत्र रीतीनें सदर लेखाचा परिणाम काय होतो याचा विचार करा. लेख वाचल्यानंतर जर माझे लेख राजद्रोही आहेत, असें आपले मत होईल तर तसें सांगा. त्या मताचा स्वीकार करण्याला आणि त्याचे परिणाम भोगण्याला मी तयार आहे. पण तुमचें मत जर मी निर्दोषी आहें असें झालें, तर मग मात्र माझी मुक्तता झाली पाहिजे. आपण माझे लेख वाचून आपलें मत बनवीत असताना ज्याप्रमाणें आपण ॲडव्होकेट जनरलच भाषण आपल्या डोळ्यापुढे ठेवाल त्याप्रमाणें माझें भाषणहि आपण मधून मधून लक्षात घ्या. आपले मत कसेहि झालें तरी त्याचा परिणाम भोगण्याला मी आपल्यापुढे तयार आहे. पण माझी अशी खात्री आहे कीं, आपण तुटक तुटक वाक्यें न वाचता जर समग्र लेख वाचाल तर ते लेख लिहिण्यामध्ये माझा हेतु प्रामाणिकपणाचा होता असेंच आपलें मत होईल. आणि माझी मनोदेवता मला असें सांगत आहे कीं, या मताचा फायदा मला झाल्याशिवाय कधींहि राहणार नाहीं.

अशा तऱ्हेचा उपोद्घात करून मी आपणांला परिस्थितीसंबंधीं कांहीं गोष्ट सांगतों. या खटल्यामध्यें आपणाला सदर लेख लिहिण्यामध्यें माझा काय हेतु होता हें पाहावयाचें आहे. प्रत्यक्ष कृत्य जरी दोषार्ह असलें तरी जोंपर्यंत तें कृत्य करण्याचा हेतु दोषार्ह ठरत नाहीं तोंपर्यंत तें कृत्यहि दोषार्ह होत नाहीं. माझा लेख राजद्रोही असेल; किंबहुना तो वाचल्यानंतर आपणालाहि तसें वाटेल. परंतु हा लेख लिहिण्यामध्यें जर माझा हेतु राजद्रोही ठरणार नाहीं तर त्यामुळें माझ्या लेखाला कांहीं बाध येत नाहीं. जर माझा हेतु निर्मळ आहे आणि सरकारनें अमुक गोष्टी कराव्या आणि सरकारनें विशिष्ट पद्धति स्वीकारावी असा सरकारला सलोख्याच्या सल्ला देण्याचा माझा लेख लिहिण्यामध्यें रोंख आहे तर यांत राजद्रोह कोठून येतो ? हिंदुस्थानसरकार आणि येथील अधिकारीवर्ग यांच्यापुढें सध्यांची हिंदुस्थानची परिस्थिति मला मांडावयाची होती. आणि माझा येवढा हेतु जर मीं सिद्ध केला तर मी निर्दोषी ठरतों. आजकाल सरकार मोठ्या पेंचांत सांपडलें आहे; आणि त्यांतून सुटका होण्यास कोणती तोड काढली पाहिजे, याचा जर मीं आपल्या लेखांत विचार केला असला तर हा माझा हेतु राजनिष्ठ आहे. मला माझ्या देशाची सुधारणा पाहिजे आहे. ही माझी उत्कट इच्छा आहे. हें माझे अंतिम साध्य आहे. तें मीं कसें संपादन करून घ्यावें ? माझ्या देशाच्या उत्कर्षाची जबाबदारी आज कोणावर आहे ? मला वाटतें कीं ती इंग्रजसरकारवर आहे. आणि म्हणूनच मला जर माझ्या जन्मभूमीची उन्नतावस्था पाहिजे असेल तर त्यासाठीं इंग्लिशसरकारकडे धाव घेऊन मागणी करणें येवढेंच फक्त माझ्या हातांत आहे. आजच्या परिस्थितींत हिंदुस्थानांतील कोणत्याहि प्रजाजनाला येवढेंच करतां येणें शक्य आहे आणि तेंच मीं केलें आहे. हें कृत्य देखील जर दोषार्ह ठरत असेल तर त्याबद्दल मी तुरुंगांत— आणि तुरुंगांतच काय, पण आपण धाडाल तिकडे—जावयाला तयार आहें. सभ्य गृहस्थहो, आपण या ठिकाणीं बसलां आहां, पण आपणांलाहि एक स्वदेश आहे. आणि म्हणूनच आपणाला हें माहीत असलें पाहिजे कीं स्वदेशभक्ति ही एक अमूल्य चीज आहे. ती स्वदेशभक्तीची चीज आपल्या अंतःकरणामध्यें बाळगणें हा गुन्हा आहे काय ? ज्या देशामध्यें मी जन्माला आलों आहें, त्या देशाचें हित कसें होईल, या लागून राहिलेल्या हृद्रोगा-

हेतूशेरीज दुसरा कोणताहि हेतु हे लेख लिहिण्यामध्यें माझ्या मनात वास्तव्य करीत नव्हता, हें मी माझे हृदय मोकळें करून आपणाला सागत आहे. आणि हा जर गुन्हा असेल तर तो गुन्हा मी केला आहे आणि त्याच्यासाठीं मला तुरुगात गेलेंच पाहिजे. पण मला वाटतें कीं, स्वदेशभक्ति हें पाप नाहीं. देशप्रीतीचा मनोविकार मोठमोठ्या महत्त्वाकाक्षी लोकाना त्याच्या देशाची सुधारणा घडवून आणण्यास सागत असतो. तोच मनोविकार माझ्या मनात जागृत होता. त्यानेंच मला हे लेख लिहिण्याला सांगितलें. आणि म्हणूनच मीं सदर लेख लिहून सरकारला माझ्या देशाच्यासबधीं विनति केली आहे; पण सरकार जरी सर्वसमर्थ असलें तरी सरकारकडूनहि कांहीं चुका होणारच नाहींत असें नाहीं. सरकार म्हणजे देव नव्हे; सरकारहि मनुष्यच आहे. आणि मनुष्य बहुधा चुकी करितो, असा सृष्टीचा नियम आहे. त्या नियमाला अनुसरून सरकारनें जें चुकीचें धोरण अवलबिलें आहे त्याला उद्देशून मीं सदर लेख लिहिले आहेत. आणि असें करण्यामध्यें सरकारला योग्य सल्लामसलत देण्याचा माझा हेतु होता. याच हेतूनें मी नेहमीं लेख लिहीत असतों. असा जर माझा हेतु नसेल तर मीं वर्तमानपत्र काढलें काय म्हणून ? आणि त्याचा सपादक झालों काय म्हणून ? माझ्या मतानें वर्तमानपत्राचें हें एक प्रमुख कर्तव्यकर्म होय. माझा देश सध्या सरकारच्या ताब्यात आहे, त्या परतत्र देशाची मला सुधारणा करावयाची आहे आणि म्हणून मीं सरकारला राज्यकारभारासबधीं सूचना केल्या आहेत. हा माझा हेतु निष्कलक आहे आणि तो तसा असल्याबद्दल मी माझ्या लेखावरून आपली थोडक्याच वेळात खात्री करून देईन.

वस्तुतः मीं आपले लेख स्वदेशभक्तीनें आणि देशाभिमानानें लिहिलेले आहेत. राजद्रोह प्रसृत करण्याचा माझा इरादा नव्हता. ज्या वेळेला मी सदर लेख लिहावयाला बसलो त्या वेळीं इंग्रज सरकारच्याविरुद्ध आपल्याला अढाळी माजवावयाची आहे असें माझें उद्दिष्ट नव्हतें. पण जाता जाता सरकारच्या दुष्कृत्यावर टीका करण्यामध्यें सरकारविषयीं थोडीबहुत अप्रीति उत्पन्न झाली असेल तर तेवढीहि सवलत सरकारनें पत्रकाराना ठेवू नये काय ? वस्तुस्थिति पुढें माडून सरकारचे दोष दाखवावयाचे म्हटले म्हणजे त्यात लेखकाचा हेतु नसला तरी सरकारबद्दल थोडीबहुत अप्रीति उत्पन्न व्हावयाचीच ! त्याला

वर्तमानपत्रकार काय करणार ? पण अप्रीति उत्पन्न करणें म्हणजे तरी काय ? मूरेच्या डिक्शनरीमध्यें Excite disaffection याचा अर्थ प्रचंड खळबळ उडवून देणें आणि भयंकर आणि घातकी मनोविकार जागृत करणें असा दिला आहे. आणि अशा तऱ्हेचा प्रयत्न जर मीं केला असेल तर मी गुन्हेगार आहें. पण मी आपणास खात्रीपूर्वक सांगतों कीं, माझा तसा हेतु नव्हता व प्रयत्नहि नाहीं. आपण माझे लेख समग्र वाचून पाहा. त्यांतील तुटक तुटक वाक्यावर आपण कटाक्ष ठेवूं नका. बॉंब हा शब्द मीं आपल्या लेखांत शंभर वेळां वापरला आहे खरा, पण मीं बॉंब शब्दच वापरला आहे; बॉंब फेंकलेला नाहीं. यासाठीं बॉंब शब्द वारंवार आल्यामुळें त्याचवरच विशेष भिस्त न ठेवता सर्व लेखाचें साग्र स्वरूप आपण लक्षांत आणावें. बेताल झालेल्या सरकारला शुद्धीवर आणण्याची माझी इच्छा होती. सरकारनें आम्हा हिंदुस्थानांतील लोकाना या वेळीं कांहीं हक्क देऊन त्याना संतुष्ट राखावें अशी माझी सरकारला विनंति होती. ही माझी विनंति राजद्रोही आहे काय ? झाल्या त्या गोष्टींना इलाज नाहीं. सरकारनें आपलें दडपशाहीचें धोरण यापुढें तरी निदान बंद ठेवावें. हिंदुस्थानातील बहुतेक लोक असंतुष्ट झालेले आहेत आणि सरकारी अधिकारी वर्ग जर आपलें अरेरावीचें धोरण असेंच चालू ठेवील तर त्याचा पुढें काय परिणाम होईल याचा सरकारनें विचार केला आहे काय ? अशा तऱ्हेची जागृतीची टोचणी मीं सरकारला लावलेली आहे, म्हणून कां तुम्ही मला राजद्रोही ठरवाल ? मीं आपल्या देशाचें असंतोषी अन्तःकरण सरकारपुढें उकलून ठेवून त्यांतील सुधारणेचीं गुप्त रहस्यें सरकारला कळविलीं आहेत यासाठीं तुम्हीं मला राजद्रोही ठरविणार ? मला वाटतें याला राजद्रोह म्हणत नाहींत. प्रत्यक्ष लॉर्ड मोर्ले यानीं देखील असेच उद्गार काढले आहेत ! हिंदुस्थानात असंतोष वास्तव्य करीत आहे आणि तो दूर करण्यासाठीं कांहींतरी उपाय योजलेच पाहिजेत असें मी पुनः एकवार निक्षून सांगतों. असें सांगून कोणा सरकारी ऑफिसरचा किंवा रिपोर्टरचा अपमान करण्याचा माझा इरादा नाहीं. फक्त वस्तुस्थिति मी आपणांपुढें मांडीत आहें. येथील बहुतेक पुढारी सरकारला राज्यकारभारात कांहीं तरी सुधारणा करण्याला सांगत आहेत आणि तेंच मींहि केलें आहे; हा माझा अपराध आहे काय ? तो जर असेल तर आम्हीं वर्तमानपत्रकारानीं काय करावयाचें ! लोकाना दयवरचेंं

वागण्याचा उपदेश जर आम्ही करावयाचा नाहीं आणि लोकांपुढें सरकारची खरीखरी स्थिति मांडून सरकारला धीर चालवयाचा नाहीं, तर मग आमचें कर्तव्य काय? आमच्या लोकांची खरी खरी स्थिति आम्हालाच माहीत असणार. ती उपऱ्या इंग्लिश लोकांना कशी कळेल? मी आपल्या देशबांधवांच्या सहवासांत असतो, उठतों आणि वागतो हे खोटें आहे काय? हे खोटें नाहीं म्हणूनच लोकांची खरीखरी स्थिति सरकारला विस्तृतपणें दर्शविण्याचा मला हक्क पोंचतो. तो आपला हक्क मी बजावला आहे; व सरकारच्या डोळ्यांत सरकारच्या दोषांचें अंजन घातलें आहे. या अंजनाचा उपयोग जर अंजन घालणाऱ्यांना तुरुंगांत घालून करावयाचा आहे तर मग सरकारनें हिंदुस्थानला बायफळ मुद्रणस्वातंत्र्य दिलें कशाला? सरकारचे कान उपटण्याचें काम वर्तमानपत्रकार करीत असतात; जर त्यांना असा मध्येंच प्रतिबंध होऊं लागला तर त्यांनीं तें काम शिरावर घेण्यांत काय फायदा? आम्ही वर्तमानपत्रकार सरकारपुढें वस्तुस्थिति मांडीत असतों. मोर्लेसाहेब सुद्धां कधीं कधीं हेंच काम करितात; पण म्हणून त्यांना राजद्रोही म्हणतां येईल काय? गेल्या महिन्यांत एकदां नव्हे, दोनदां नव्हे, तर तीनचार वेळां हिंदुस्थानच्या वस्तुस्थितीचें दिग्दर्शन इंग्लंडमध्यें केलें गेलें होतें असें इंग्लिश पत्रांमधील तारांमधून आपल्याला आढळून येईल. मोर्लेसाहेब हे हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी आहेत. ते स्टेट सेक्रेटरी म्हणतात, 'आपण इंग्लिश लोकांनीं विद्यामृत पाजिलें आहे ह्यामुळें त्यांच्या अंतःकरणांत स्फूर्ति उत्पन्न झाली आहे, तेव्हां त्या स्फूर्तीची तृप्तता केलीच पाहिजे. असंतोषाचा सर्प कांहींतरी हक्काच्या देणगीच्या मंत्रानें भारून टाकला पाहिजे. दशमुखी दडपशाही करून चालावयाचें नाहीं.' हे मोर्लेसाहेबांचे उद्गार आपण ध्यानांत ठेवा. त्याचाच अनुवाद आम्ही आपल्या पत्रांत करीत असतों. आम्हा हिंदुस्थानांतील लोकांना ब्रिटिश सरकारची मानता भंग करावयाची नाहीं, तर ती राखावयाची आहे. पण म्हणून आम्ही अधिकाऱ्यांच्या अरेरावी वर्तनावर टीका करूं नये हा कोठला न्याय? स्वराज्यासारखे कांहींतरी राजकीय हक्क लोकांना या वेळीं मिळाले पाहिजेत. दडपशाहीनें कोणालाहि दडपतां येणें कधींच शक्य नाहीं; सलोख्यानेंच सर्व कारभार चालविला पाहिजे. आणि हेंच मीं आपल्या लेखांत सुचविलें आहे. याला तुम्ही गुन्हा म्हणाल काय? हा सरकारबद्दल द्वेष नाहीं. आणि अशी सूचना करणें म्हणजे जर

द्वेष असेल तर मैत्री शब्दाचा अर्थ माझ्या मतें यापुढें तरी कळला पाहिजे.

माझें वर्तमानपत्र दर आठवड्याला प्रसिद्ध होत असतें आणि माझी लेख लिहिण्याची पद्धत अशी आहे:—माझ्या ऑफिसमध्यें जितकीं पत्रें येतात तीं सर्व मी आधीं वाचतों. याच ठिकाणीं मला हेंहि सांगितलें पाहिजे कीं, लेख लिहिण्यामध्यें मला एक वाईट खोड लागलेली आहे; पण ती खोड जरी आपल्या दृष्टीनें वाईट असली तरी ती खोड आपल्या अंगीं असल्याबद्दल मला आनंद आणि अभिमान वाटतो. एका आठवड्यामध्यें जितक्या कांहीं गोष्टी घडून आल्या असतील तितक्या सर्व पद्धतशीर रीतीनें, कदलीदलन्याया-बरहुकूम सुसंगत अशा, लोकांपुढें मांडून आणि निरनिराळ्या गोष्टींचे दुवे एकमेकांना जोडून एकजीव साखळी करावयाची हीच ती वाईट खोड ! तिचा उपयोग मीं सदर लेखांत केला आहे. असा उपयोग करण्यामध्यें माझा कांहीं हेतु नसतो; तरी पण ही वाईट खोड मला बरेच वेळां नडली आहे व आतांहि नडत आहे. आठवड्यामध्यें घडून येणाऱ्या गोष्टी मी स्वतः उत्पन्न करीत नाहीं शिवाय जें मी लिहितो तें त्या आठवड्यामध्यें घडून आलेलें असते. सरकारचीं मागलीं दुष्कृत्यें उकरून काढून त्यांवर टीका करण्याचा माझा प्रघात नाहीं. आणि म्हणूनच माझा हेतु राजद्रोह प्रसृत करण्याचा नाहीं असें मी म्हणतों. माल्टा येथें घडून आलेला प्रकार माझ्या कल्पनाशक्तीनें उत्पन्न केलेला नाहीं. तो वस्तुस्थिति आहे आणि तिचाच विचार मीं आपल्या लेखात केला आहे. आणि हा असा विचार गुन्हा ह्मणून मानला जात नाहीं. हा वादविवाद आहे; लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमध्यें ज्या वेळेला हा राजद्रोहाचा कायदा पसार झाला त्या वेळेला अशा तऱ्हेचे वादविवाद वर्तमानपत्रकारांना करण्याचा हक्क आहे असें सांगण्यात आलें होतें. पण असा वादविवाद आज राजद्रोह होऊं पाहत आहे. वादविवादाचें मूळ कारण राजद्रोहाची इच्छा नसून वस्तुस्थितीचें निदर्शन आहे.

या ठिकाणीं लॉर्ड कॅनिंनन यांनीं ज्यूरीला खटला समजावून सांगतांना केलेल्या भाषणामधील उतारा प्रो० परांजपे वाचून दाखवूं लागले. पण तो दाखवितांना ते थोडेसे साशंक होऊन ह्मणाले, 'मीं कायद्याचा अभ्यास केलेला नाहीं. तरी अशा ठिकाणीं हा उतारा वाचून दाखविणें अनिष्ट असेल तर तो मी वाचीत नाहीं.'

न्या० मू० दावर यांनीं 'उतान्यानें सदरल्याला कोणत्याहि प्रकारें बाध येत नाहीं' असें मागितल्यावर पराजप्यांनी भाषण पुढें चालू केलें. ते म्हणाले:-

लॉर्ड केनिंगन म्हणतात, 'सुधारणा आणि क्रांति या दोन गोष्टी इंग्लंडमध्यें घडून आलेल्या आहेत, त्याचें सर्व श्रेय वादविवादाच्या मुद्रणस्वातंत्र्याकडे आहे. हे श्रेय इंग्लंडमधील ज्यूरीनें दिलेलें आहे.' हे लॉर्ड केनिंगन याचे उद्गार, ज्यूरीमधील सभ्य गृहस्थहो! आपण लक्षांत ठेवा. वादविवाद करण्याची पूर्ण मोकळीक असावी. हेतु दूषित नसेल तर कडक वादविवादाला बाध येत नाहीं. माझ्या हेतूवर आपल्याला अनेक आरोप करिता येतील, पण सरकारला सल्ला देण्याच्या एका हेतूशिवाय दुसरा कोणताहि हेतु पुराव्यानें आपल्याला दाखवीत करिता येणार नाहीं. या माझ्या म्हणण्याची सत्यता माझे लेख वाचल्यानंतर आपल्या लक्षांत येईल. मला सरकारविरुद्ध द्वेष उत्पन्न करावयाचा नाहीं, किंवा अप्रीति वाढवावयाची नाहीं. राष्ट्राची सर्व सुधारणा एका व्यक्तीच्या हातांत नाहीं. ती व्यक्तीच्या हातांत जितकी आहे आणि जितकी करण्याबद्दल सरकारची सदर परवानगी आहे तितकीच ती मीं केली आहे. यांत माझा कांहीं दोष नाहीं. आपल्यापुढें जे लेख आहेत त्यामधील माझीं विधानें सत्य आहेत. तीं असत्य असल्याबद्दल सरकारतर्फे कोणताहि पुरावा पुढें करण्यांत आला नाहीं. काळ पत्राचा मालक, संपादक व प्रकाशक मी आहे येवढेंच सरकारनें आपल्या पुराव्यानें दाखवीत केलें आहे व तें मी कबूल करितों. पण लेखांत मीं जे लिहिलें आहे तें खोटें आहे असें सरकारनें सिद्ध केलें आहे काय? नाहीं. आणि म्हणूनच मीं जे लिहिलें आहे तें अक्षरशः खरें आहे. पण मी असें म्हणतों म्हणूनच आपण तें खरें मानू नका. त्याबद्दल मी आपल्याला पुरावा सादर करितों. सरकारविरुद्ध अप्रीति उत्पन्न करणें ती मीं उकरून काढून केली नाहीं. सरकारच स्वत: आचरणाविषयीं अप्रीति उत्पन्न करून घेत आहे. मीं आपले लेख सरकारला उद्देशून लिहिले आहेत; लोकांना उद्देशून लिहिलेले नाहीत. सरकारसंबधीं लेख लिहितांना देखील ते मी सरकारला सत्यस्थितीचा उपदेशादाखल लिहिले आहेत. लेखामध्यें लोकांसंबंधीं एक अक्षर देखील काढलें नाहीं. आणि हे लेख केवळ वादविवादात्मक आहेत. (स्टीफन्स याच्या भाषणामधील उतारा वाचून दाखवून,) त्याप्रमाणें इंग्लंडमधील निरनिराळ्या पक्षाचीं वर्तमानपत्रें एकमेकांवर टीका करितात

त्याप्रमाणें तीं वर्तमानपत्रें आपल्यापुढें ठेवून इंडियन लोकांनीं लेख लिहावे असें मि० स्टीफन्स यानीं व्हाइसरॉय साहेबाच्या कायदेकौन्सिलमध्यें सांगितलें आहे आणि तदनुरूपच मीं हे लेख लिहिले आहेत असें मला वाटतें. सदर लेखांत जरा कोठें कडक भाषा लिहिण्यात आली असेल, नाहीं असें नाहीं; पण हें स्वातंत्र्य आह्मा वर्तमानपत्रकाराना अवश्य पाहिजे. इतकी सवलत देण्याला वर्तमानपत्राचा कायदा कंठशोष करून सांगत आहे. असा स्पष्ट दऱ्हेचा वादविवाद राजकीय बाबतींमध्यें झालाच पाहिजे; पण तो करूं देणें, जज्जसाहेब आणि ज्यूरीमधील सभ्य गृहस्थहो ! सर्वस्वीं आपल्या हातीं आहे.

पण तो फायदा जर आह्मांला घेऊं दिला नाहीं, तर आह्मीं लेखकांनीं काय करावें ? लॉर्ड फिट्सजेरॉल्ड यानीं सुलिव्हानच्या खटल्यामध्यें ज्यूरीच्या हातात मुद्रणस्वातंत्र्य आहे असें सांगितलें आहे....मुद्रणस्वातंत्र्याचा हक्क बजावूं देणें ज्याप्रमाणें ज्यूरीच्या स्वाधीन आहे, त्याचप्रमाणें कायद्याचा फाजील कडकपणाहि ताळ्यावर आणणें ज्यूरीच्या स्वाधीन आहे. लॉर्ड फिट्सजेरॉल्ड यानीं इंग्लंडमधील ज्यूरीला असें ह्मटलें होतें कीं, "आह्मां सर्वांना मुद्रणस्वातंत्र्याचा हक्क शाबीत करून घेण्याला फार किंमत पडली आहे. त्या किंमतीचें संरक्षण करण्याला ज्यूरर लोक हेच केवळ समर्थ आहेत." ज्यूरीमधील सभ्य गृहस्थहो ! हेच लॉर्ड फिट्सजेरॉल्ड याचे शब्द मी आपल्याला उद्देशून फिरून उच्चारतों; आपण हिंदुस्थानच्या मुद्रणस्वातंत्र्याचे संरक्षक आहां. आज हिंदुस्थानचें मुद्रणस्वातंत्र्य मोठया पेंचात सांपडलें आहे. त्याची सुरक्षितता दृढ करणें तुह्मांला फार सुलभ आहे. ह्या महत्कार्याचें श्रेय घ्या. हें पुण्य आपल्या पदरीं बांधा आणि आपली कीर्ति त्रिखंड करा. तुम्ही माझे देशबांधव आहां. तुह्मी हिंदुस्थानांत राहत आहां. या वेळीं हिंदुस्थानात मुद्रणस्वातंत्र्याचा दुरुपयोग होऊं न देणें आणि त्याची अबाधितता सुरक्षित करणें तुमचें कर्तव्य आहे. हें दैवी महत्कार्य करणे परमेश्वरानें तुमच्याकडे सोपविलें आहे हें तुमचें सुभाग्य आहे.

काल ॲड्व्होकेट जनरल यानीं सरकारतर्फे भाषण करतांना आपणांला असें सांगितलें आहे कीं, सध्या हिंदुस्थानात असे कांहीं नेटिव्ह लेखक आहेत कीं, ते आज एक लेख लिहितील आणि तो लेख लिहिण्यामधील हेतु असा नसून दुसराच कांहीं तरी आहे असें ह्मणूं लागतील. आणि हें मी. कबूल

करतो कीं, हें विधान कांहीं कांहीं ठिकाणीं प्रत्ययाला येतेंहि, पण सर्वत्र असेंच असतें असें नाही. या प्रश्नाला दुसरीहि एक बाजू आहे. जसें पुष्कळ वेळा घडून येतें—आणि हे आपल्या प्रत्ययाला नेहमी आलें असेल—कीं, लेखक एक गोष्ट लिहितो व वाचक त्याचा भलताच अर्थ समजतो. अशी स्थिति ज्या वेळेला होईल त्या वेळेला लेखकानें आपला अर्थ स्पष्टपणें कळविणें रास्त नाहीं काय ? आणि याच दृष्टीनें मी आज माझ्या लेखाचा अर्थ आपल्याला सांगणार आहें. मी आपले शब्द फिरविणार नाहीं. पण अर्थासंबधानें ज्या वेळीं दोन पक्षामध्यें मतभेद झालेला आहे त्या वेळी मी काय करावें ? माझा खरा अर्थ मी ज्यूरीला समजावून सांगू नये काय ? असा अर्थ मी सांगितला तर मीं एक गोष्ट लिहिली आणि ती दुसऱ्या वेळेला फिरविली हा दोष माझ्या माथीं कसा येईल ? खास नाहीं. या ठिकाणीं ॲडव्होकेट जनरल चुकत आहेत तो माझा खरा खरा अर्थ आपणास समजला म्हणजे माझा हेतु निर्दोषी आहे अशी आपली खात्री होईल व मग माझी मुक्तता होणें इष्ट आहे. पण माझा खरा खरा अर्थ समजून सांगून देखील जर माझा हेतु आपणाला गर्ह्य वाटेल तर त्याबद्दल शिक्षा भोगण्याला मी तयार आहें.

या मुद्द्यासंबधीं आपल्याला मला आणखी एक उतारा वाचून दाखवावयाचा आहे हा पॅटरसनच्या 'Liberty and the Press' या पुस्तकांतील आहे. त्यामध्ये त्यानीं असें म्हटलें आहे कीं, लेख कितीहि कडक असला तरी लेख लिहिण्यातील हेतु निर्मळ असेल तर आरोपीची मुक्तता झालीच पाहिजे. अशा तऱ्हेचे अनेक दाखले इंग्लंडमध्यें घडून आलेले आहेत आणि निष्फळ हेतूनें कडक भाषा वापरणाराची ज्यूरींनीं इंग्लंडमध्यें मुक्तता केली आहे. हें सर्व मी आपल्या पदरचें सांगत नाहीं. या पुस्तकांत हें प्रत्यक्ष लिहिलेलें आहे. 'लेखकानें जोरदार भाषा वापरून सरकारविरुद्ध लढाई सुरू केली आहे, पण लेखकाचा हेतु प्रामाणिक आणि कायदेशीर आहे' असा ज्यूरीनें आपला अभिप्राय एका खटल्यामध्यें दिला आहे.

माझ्या दृष्टीनें माझा अर्थ व्यक्त करण्याला माझ्या लेखाचें कसें विवरण केलें पाहिजे त्याचें मीं एक टिपण करून आणलं आहे. आपण हें लक्षांत ठेवा कीं माझा पधरा मेचाच लेख सरकारनें गुन्हा मानलेला आहे, बाकीचे

तीन लेख तो गुन्हा शाबीत करण्यासाठीं पुढें केले आहेत. त्या तीन लेखां-संबंधीं मी मागाहून बोलेन. पंधरा मेचा लेख लिहितांना माझ्या मनाची जी स्थिति होती तिला अनुसरून मीं त्या लेखाचें विवरण केलें आहे. मला अशी खात्री आहे कीं आपण माझा लेख वाचला आहे. आपणांला जर माझा लेख मूळ भाषेंत म्हणजे मराठींत वाचता येणें शक्य असतें तर तें माझ्या दृष्टीनें मला फार सोइस्कर झालें असतें. व अशा दृष्टीनें विचार करतां आम्हां हिंदुस्थानांतील वर्तमानपत्रकाराची स्थिति फार कष्टप्रद आहे. आम्ही लेख एका भाषेंत लिहितों आणि आम्हाला त्याचा पुरावा दुसऱ्या भाषेंत द्यावा लागतो. माझी स्वतःची इच्छा मराठी लिहिण्याची आणि मराठी पुरावा देण्याची होती; पण आपणांला मराठी समजत नाहीं, मग माझ्या मराठीचा काय उपयोग? आणि म्हणूनच मीं मराठी पुरावा देण्याची कल्पना सोडून दिली.

जरी मी बऱ्याचशा इंग्रजी परीक्षा पास झालों आहे आणि वयाचीं पुष्कळशीं वर्षे युनिव्हर्सिटीमध्यें घालविलीं आहेत तरी मला हें कबूल केलेंच पाहिजे कीं मी काहीं इंग्रजी वक्ता नाहीं. माझ्या भाषणामध्येंहि कित्येक चुका झाल्या असतील आणि म्हणूनच मी आपणांला सांगतों कीं, आपणापैकीं कोणाला जर मराठी येत असेल तर त्यानें माझ्या लेखाच्या इंग्रजी भाषांतरावर यत्किंचित्‌हि भिस्त ठेवूं नये. भाषांतरें चुकीचीं आहेत किंवा बरोबर आहेत यापैकीं मी काहींच म्हणत नाहीं. पण आजपर्यंतच्या अनेक लेखकांनीं असें म्हणून ठेवलेलें आपल्याला आढळून आलें असेल कीं, कसेंहि भाषांतर असलें तरी तें मूळ लेखाचें हुबेहुब प्रतिबिंब पाडण्याला समर्थ होत नाहीं. आणि माझी अशी खात्री आहे कीं, आपण जर माझे लेख मूळ मराठीमध्येंच वाचाल तर भाषांतराच्या वाचनानें झालेलें आपलें मत खास पालटेल. असो. आपण मूळ मराठी लेख वाचा किंवा त्यांचीं इंग्रजी भाषांतरें वाचा. काहीं केलें तरी लेख लिहिण्यामधील माझा अर्थ आणि हेतु जो मीं आतां आपल्यापुढें मांडणार आहे तिकडे आपलें सावधान चित्त असूं द्या म्हणजे झालें. माझ्या मतें मीं पंधरा मेच्या लेखाचे दोन भाग केले आहेत. (१) पोलिसांच्या कर्तबगारीबद्दल बक्षिसें वाटणें, (२) मुजफरपुर येथें घडलेल्या बाँब प्रकरणाबद्दल आपलें मत सांगणाऱ्या आणि सरकारला दडपशाहीचें धोरण सुरू ठेवण्याचा उपदेश करणाऱ्या सभा. ॲडव्होकेट जनरल यांनीं माझा

लेख आपणाला समग्र वाचून दाखविला व नंतर त्यांनीं त्यातील काहीं निवडक वेचे आपल्यापुढें मांडले; पण माझी पद्धत निराळी आहे. कायद्याचीं जीं काहीं पुस्तकें माझ्या वाचनामध्ये आलीं आहेत त्यावरून मला असें वाटतें कीं, सर्व अग्रलेखाचा विचार एकदम करावा, असें त्यामध्ये लिहिलें आहे. त्याप्रमाणे आपण करावें अशी मी आपल्याला सप्रेम विनंति करितों.

माझ्या लेखामधील पहिला भाग बक्षिसें वाटण्यासंबंधीं आहे. बक्षिसें वाटण्यापूर्वीची परिस्थिति कशी होती हे आपल्याला माहीत आहे. तें मी सांगावयाला पाहिजे असें नाहीं. कलकत्त्यामध्ये बॉम्ब गोळे फेंकण्यात आले होते व त्याचे शोचनीय परिणाम घडून येत होते. त्यानंतर काहीं दिवसांनीं कलकत्त्यामधील पोलीस ऑफिसरांना आणि शिपायांना बक्षिसें देण्यात आलीं. अशी ही पूर्वस्थिति आहे. आणि हीच पूर्वस्थिति लक्षात घेऊन मी हे लेख लिहावयास बसलों! आणि लेखाच्या प्रारंभीं बक्षिसें मिळालेल्या पोलीस अमलदारांचीं नांवें व बक्षिसाची रक्कम दिली आहे. आणि त्यानंतर मीं असें म्हटलें आहे कीं, बॉम्ब गोळ्याच्या प्रकरणात पोलीस लोकांनीं जी बहादुरी गाजविली, त्या बहादुरीबद्दल बक्षिसें वाटण्यात सरकारनें जरा घाई केली. हे जे विधान मीं केलें आहे त्याची सत्यता पटविण्यासाठीं मीं कारणेंहि सांगितलीं आहेत. तीं कारणें चुकीचीं नाहींत अशी माझी ठाम समजूत आहे. असें असून देखील जर माझ्या विचारसरणींत दोष असेल आणि तो कोणी मला दाखवून देईल ( अजूनपर्यंत तो कोणीं दाखवून दिला नाहीं ), तर तो दोष कबूल करण्याला मी तयार आहें. पण फार कशाला, मी पुनः एकदा सांगतों कीं माझी अजून देखील अशी समजूत आहे कीं, बक्षिसें वाटण्यामध्यें सरकारनें घाई केली. बॉम्बप्रकरणामध्ये सरकारनें ज्या लोकांना पकडलें त्यांची अजून चौकशी व्हावयाची होती. चौकशी होऊन ते लोक दोषी ठरल्यानंतर मग त्यांना पकडण्याबद्दल पोलिसांना बक्षिसें दिलीं असतीं तर त्यात काहीं वावगें झालें नसतें.

अशा तऱ्हेचे विचार प्रथमतः प्रदर्शित करून नंतर पुढें मीं बक्षीस म्हणून दिलेल्या रकमेबद्दल काहीं उद्गार काढिले आहेत. ही बक्षिसाची रक्कम सरकारची खासगी शिल्लक नसून लोकांची आहे. आणि योग्य वेळेआधीं बक्षिसें देण्यात आलीं असें आपणाला एकदा दिसून आलें कीं, बक्षिसें देण्याच्या रकमेचा दुरुपयोग करण्यात आला असें म्हणणें ओघानेच प्राप्त होतें; अशा

तऱ्हेनें बक्षिसें देण्याची वेळ आणि बक्षिसांची रक्कम यांसंबंधीं विचार केल्यानंतर बक्षिसें ज्याना दिलीं त्या पोलीस ऑफिसरासंबंधीं विचार केला आहे. बॉबप्रकरणामध्यें युरोपियन अमलदार आणि नेटिव्ह पोलीस अंमलदार हे दोघेहि चौकशी करीत होते. त्या त्याच्या चौकशीमध्यें नेटिव्हापेक्षा युरोपियन पोलिस अंमलदारानींच अधिक कौशल्य दाखविलें असावें असें माझें स्वभावतःच मत झालें आणि म्हणूनच मीं लेख लिहिण्याच्या वेळीं यासंबंधीं आपल्या मनाला प्रश्न विचारला कीं, 'हे कसें घडून आलें ? युरोपियन पोलीस अमलदारांचें कौशल्य अधिक आणि त्यामुळे बॉबप्रकरणातील सर्व आरोपी सापडले; असें आहे तर मग युरोपियन पोलीस अंमलदाराना बक्षिसें कां दिलीं नाहीत ?' ज्याना बक्षिसें देण्यात आलीं आहेत त्याची यादी जर आपण वाचाल तर आपल्याला असें आढळून येईल कीं ही सर्व बक्षिसें काळ्या पोलीस अंमलदारांना वाटण्यात आलीं आहेत. कौशल्य युरोपियन पोलीस अंमलदाराचें आणि बक्षिसें काळ्या पोलीस अंमलदाराना, हें घडावें कसें ? सदर आरोपी पकडण्याच्या कामीं काळ्या अमलदारापेक्षा युरोपियन पोलीस अंमलदारानीं अधिक चाणाक्षपणा दाखविला असें जे मीं आपल्या लेखात लिहिलें आहे तो माझा केवळ तर्क नव्हे, त्याला सबळ पुरावाहि आहे. मुंबईच्या टाइम्स ऑफ इंडियाला कलकत्त्याच्या बातमीदारानें जें नुकतेंच बातमीपत्र पाठविलें आहे, त्यामध्यें त्यानेंहि असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, काळ्या पोलीस अंमलदारापेक्षा गोऱ्या अंमलदारानीं या कामीं अधिक कौशल्य दाखविलें. किंबहुना त्या कौशल्यामुळेंच काळ्या पोलीस अंमलदाराना बॉबप्रकरणातील आरोपी पकडता आले. तें टाइम्स ऑफ इंडियाच्या बातमीपत्रामधील वाक्य मी आपणांस वाचून दाखवितों.

टाइम्स ऑफ इंडियामध्यें स्पष्ट लिहिलें आहे कीं, बॉबप्रकरणांतील आरोपी पकडण्याला नेटिव्ह पोलीस अंमलदाराना आर्मस्ट्रॉंग साहेबांनीं खूण सांगितली. इतकेंच नव्हे तर खुदीरामासंबंधीं माहिती जर आर्मस्ट्रॉंग साहेबांनीं नेटिव्ह पोलीस अंमलदाराना दिली नसती तर खुदीराम देखील सांपडणें मुष्किलीचें झालें असतें. याच गोष्टीचा ऊहापोह मीं बावीस मेच्या अंकात केला आहे. यावरून हे सिद्ध होतें कीं, माझा युरोपियन आणि नेटिव्ह या दोन जातींमध्यें वैमनस्य उत्पन्न करण्याचा मुळींच हेतु नव्हता. हा जातीचा प्रश्न नसून पोलीस

अमलदार, बक्षिसें आणि ज्याच्या अंगी कौशल्य आहे व त्याचा उपयोग कसा करावा हे ज्याना माहीत आहे, असे पोलीस या सर्वांचा आहे. हे सर्व विचार मीं लोकाना उद्देशून प्रदर्शित केलेले आहेत, जातीला उद्देशून केलेले नाहीत. यानतर असा प्रश्न उद्भूत होतो की, अशी वस्तुस्थिति असता मग ही बक्षिसें विशिष्ट माणसासच का देण्यात आलीं? याच प्रश्नाचा मी पुढ खल केला आहे, माझ्या लेखातील हा भाग फार महत्त्वाचा आहे. हाच भाग नीट समजण्याला आपणाला मराठी भाषा अवगत असण्याची फार आवश्यकता होती. आपणापैकीं कोणाला जर मराठी भाषा समजत असेल तर माझ्या लेखातील हा मूळ भाग त्यानीं अवश्य नीट लक्षपूर्वक वाचून पाहावा, अशी मीं त्याना विनति करितों मला आपणाला एकदोन गोष्टी सांगितल्या पाहिजेत; मी काहीं बढाई मारीत नाहीं, पण मी बॉबे युनिव्हर्सिटीमध्ये शिक्षत होतों त्या वेळी इग्लिश भाषेबरोबर मीं सस्कृत भाषेचे विशेष अध्ययन केले आहे आणि सस्कृत ग्रथकार ज्या पद्धतीने आपले ग्रथ लिहितात त्याचप्रमाणें आपली भाषा असावी अशी माझी प्रथमपासूनच उत्कट लालसा होती. सस्कृत भाषेतील लेखक तत्त्वज्ञानासबधी लिहिताना अशाच भाषेचा अवलब करीत असतात. 'विषयो विषयश्चैव पूर्वपक्षस्तथोत्तर' । सिद्धान्तश्चेति पचाग शास्त्रेऽधिकरण स्मृतम् ॥' या वचनांत दिलेल्या रीतीनें विवेचन करावयाची सस्कृत ग्रथकाराची पद्धति आहे. प्लेटो वगैरे तत्त्ववेत्त्यानी देखील लिहिण्याचा हाच मार्ग स्वीकारला आहे या सस्कृत श्लोकात दिल्याप्रमाणेंच प्लेटोनें आपले वादविवाद लिहिले आहेत प्लेटोच्या प्रश्नांना उत्तरें सॉक्रेटीसकडून देण्यात येतात. सस्कृतमध्ये पूर्वपक्ष जो मानला आहे, त्याचें काम इग्रजी भाषेमध्ये प्लेटोकडून करविण्यात येते. आणि सॉक्रटीस हा सस्कृतमधील सिद्धांती बनतो. कोणत्याहि प्रश्नाचा निर्णय करण्याच्या आधी एकाने प्रश्न विचारावयाचा व दुसऱ्यानें त्याचे उत्तर द्यावयाचें असा क्रम आहे. आता हाच नियम व हीच लिहिण्याची पद्धति माझ्या लेखामध्ये मला लागू करावयाची आहे. इग्लिश सरकारने नेटिव्ह पोलीस अमलदारास योग्यता नसता बक्षिस का दिलें? या प्रश्नाचें उत्तर मीं पूर्वपक्ष आणि उत्तरपक्ष करून देण्याचें ठरविलें. पूर्वपक्षी म्हणाला की, इग्लिशाच हे बक्षीस देण्याच वर्तन फितुरी माजविण्याचें आहे; पण माझ्या मतें ती फितुरी नव्हती. तेव्हा या मताचे खडन करण्यासाठी मला

उत्तरपक्ष करावा लागून दुसरा एक दाखला द्यावा लागला; आणि त्या दाखल्यांत कशी फितुरी आहे व म्हणूनच इंग्लिशाच्या बक्षिसें देण्याच्या वर्तनात कशी फितुरी नाहीं हें मीं पुढें सिद्ध केले आहे. पूर्वपक्षानें या वर्तनाला फितुरी म्हटलें व त्याचे मीं निराकरण केलें. यांत मीं राजद्रोह केला असें आपण म्हणाल काय ? पण लेखात दिलेला दाखला मीं कल्पनेनें काढला नाहीं, किंवा फार पूर्वी घडून आलेल्या गोष्टीहि मुद्दाम नव्यानें उकरून काढलेल्या नाहींत. मीं घेतलेला माल्टाचा दाखला त्याच आठवड्यांत घडून आलेला आहे. हा आठवडा म्हणजे आठ मेपासून पंधरा मेचा होय. हें माल्टाचें उदाहरण त्या आठवड्यामध्यें छापलेलें आपल्याला बऱ्याच वर्तमानपत्रांतून आढळून येईल. ही माल्टाची हकीकत त्या आठवड्याच्या टाइम्स ऑफ इंडियामध्यें छापून प्रसिद्ध झाली आहे. नेटिव्ह वर्तमानपत्रकारांना दर आठवड्यास इंग्रजी वर्तमानपत्रामधून ज्या कांहीं तारा प्रसिद्ध होतात त्याशिवाय त्या आठवड्याची माहिती मिळविण्याचा दुसरा मार्ग कांहीं उपलब्ध नाहीं. माल्टाची तार सदर वर्तमानपत्रामध्यें वाचतांच लेख लिहिण्याच्या वेळीं पूर्वपक्षाचें खंडण करण्याला व उत्तरपक्षाचें मत प्रस्थापित करण्यासाठीं उदाहरण म्हणून देण्याला माल्टाचा वृत्तांत ठीक आहे असें मला वाटलें. (माल्टासंबंधींचा मूळ लेख वाचून दाखवून,) माल्टामध्यें एक गोष्ट झाली व तशीच कलकत्त्यांत घडून आली. एक फितुरी आहे, दुसरी नाहीं. दोन्ही गोष्टींमध्यें कांहीं बाबतींत साम्य आहे व कांहीं बाबतींत नाहीं. दोन्ही प्रकरणांमध्यें घडलेल्या हकिकती सारख्याच आहेत; पण त्याचे घडलेले परिणाम मात्र भिन्न आहेत. मीं माल्टाचें दिलेलें उदाहरण कलकत्यांतील प्रकाराला लागू पडतें, म्हणून मी कलकत्यातील प्रयत्न फितुरीचा झाला असें म्हणतों, असें मुळींच नाहीं. माल्टा व कलकत्ता या दोन्ही देशामधील साम्य आणि भेदहि मीं आपल्यापुढें मांडला आहे. यांत मीं राजद्रोह काय केला ? एकच गोष्ट परिस्थिति भिन्न असल्यामुळें भिन्न दिसत आहे व ही सदर गोष्टीची भिन्नता सत्य आहे. दोन्ही ठिकाणीं एकच गोष्ट घडून आली; पण माल्टाच्या परिस्थितींत ती फितुरी ठरते व कलकत्त्याच्या परिस्थितींत राजनिष्ठा म्हणून शोभते. दोन गोष्टी सर्वतोपरी एक आहेत असें मीं म्हटलें नाहीं. साधर्म्य म्हणजे साम्य आणि भेद म्हणजे भिन्नतेसह साम्य. माल्टा आणि कलकत्ता या दोन देशांमध्यें कांहीं गोष्टींत भेद

आहे. साधर्म्य कोणकोणत्या गोष्टींत आहे व भेद कोणकोणत्या बाबींत आहे हेंहि मी माझ्या लेखात सांगितलें आहे सरकारतर्फे जो पुरावा आपल्यापुढें मांडण्यात आला आहे त्यामध्यें असें सांगितल आहे की, माझ्या माल्टाच्या आणि कलकत्त्याच्या उदाहरणामध्यें फक्त साधर्म्य दर्शविलें आहे पण माझ्या भाषणात मी येवढेच नमूद करणार आहें कीं, माल्टा–कलकत्त्यामध्यें साधर्म्य आहे तसाच भेद आहे हेंहि मीं दाखविलें आहे अशा तऱ्हेचा माझ्या मनाचा ग्रह मीं आपणाला सांगितल्यानतर आपल्यालाहि माझ्या म्हणण्याची सत्यता पटेल व ती पटल्यानतर मीं राजद्रोह केला नाहीं अशीहि आपली खात्री होईल आपणापुढें माझ्या लेखाचीं भाषातरें आहेत ही टाइम्स ऑफ इंडिया-मध्यें छापून प्रसिद्ध झालीं आहेत हीं मॅजिस्ट्रेट कोर्टमार्फत केलीं गेलीं आहेत असें मला वाटतें या भाषातरात माल्टा–कलकत्त्यासंबधीं लिहितांना मीं फरक 'Difference' हा शब्द वापरलेला आपल्याला दिसून येईल. यावरून हें मीं सांगावयाला नकोच कीं माल्टामध्यें घडलेला प्रकार फितुरीचा होता व कल-कत्त्याचा प्रकार राजनिष्ठेचा होय.

हा माल्टा–कलकत्त्यामधील फरक कोणता, हें मी आता आपणाला साग णार आहें हिंदुस्थानच्या राज्यकारभारात हिंदुस्थानच्या लोकांचा हात नाहीं माल्टाच्या राज्यकारभारात तो आहे आणि हाच या दोन विषयामधील विशेष फरक होय जी गोष्ट इग्लडमध्यें खरी आहे तीच हिंदुस्थानमध्यें खरी होत नाही कारण इग्लडची राज्यपद्धति व हिंदुस्थानची राज्यपद्धति निराळी आणि म्हणूनच जी गोष्ट इग्लडमध्यें फितुरी ठरते तीच हिंदुस्थानात राजनिष्ठा ठरते येथील राज्यपद्धतींत आमचा मुळींच हात नाहीं असें नाहीं काही कारभार आमच्या हातात आहे व काहीं दुसऱ्याच्या हातात आहे आमचे काहीं पुढारी व्हाइसरॉयाच्या कौन्सिलमध्यें जाऊन बसतात हे खरे, पण म्हणून आमचा राज्यकारभार आमच्या हातून चालतो असें होत नाही. हा जो दोन परिस्थितींमध्यें फरक आहे तो या दोन देशातील राज्यकारभाराच्या भिन्नत्वामुळें आहे म्हणून इग्लडमधील राजकीय गोष्टींकडे आपण ज्या दृष्टीनें पाहतों त्याच दृष्टीनें हिंदुस्थानच्या राजकीय गोष्टींकडे आपल्याला पाहता कामा नये अशी जर स्थिति आहे तर राजद्रोह उत्पन्न करण्याचा आरोप ठेवण्याला कोठें जागा आहे! आपण जर माझा लेख लक्षपूर्वक वाचाल

तर मीं कलकत्यातील प्रकाराला फितुरी म्हटलें नसून ती फितुरी आहे असें जर कोणी म्हणेल तर त्या मताचें खंडण कसें करावें हें मीं माझ्या लेखांत सांगितलें आहे असे आपल्याला आढळून येईल.

असो; लेखाच्या शेवटीशेवटीं मी फितुरीसंबंधीं कांहीं उद्गार काढले आहेत असें काल ॲडव्होकेट जनरलनीं सांगितलें. ते उद्गार तसे काढण्याचा माझा बिलकुल हेतु नव्हता. असें असून तो हेतु आपण माझ्यावर लादला तर आम्हीं हिंदुस्थानातील लोकांनीं आपलीं तोंडें बंदच ठेविलीं पाहिजेत व टीका करण्याचें आणि सद्यःस्थिति कळविण्याचें कार्य आम्हीं इतःपर सोडूनच दिलें पाहिजे. "केव्हां तरी आम्हाला स्वराज्य मिळणार आहे. ब्रिटिश सरकार आपण होऊनच तें एक दिवस आम्हाला देणार आहे," याच फोल आशेवर आम्हाला पुढील दिवस काढणें भाग आहे. असो. अशा तऱ्हेनें मीं या प्रकरणीं पूर्वपक्ष आणि उत्तरपक्ष करून काय सिद्ध केलें ? बक्षिसें योग्य वेळेच्या आधीं देण्यांत आलीं हें सरकारचें वर्तन चुकीचें झालें आहे. आणि याचाच वादविवाद करून मीं पुढें तत्त्वबोध सिद्ध केला आहे. अशा दृष्टीनें आपण माझ्या लेखाचा विचार केला तर सरकारविरुद्ध अप्रीति उत्पन्न करण्याचा प्रयत्न मीं केला नाहीं असे आपल्याला दिसून येईल. बक्षिसें अगोदर दिलीं हें मी *अजूनहि म्हणतों. बक्षिसें अगोदर देण्याच्या कृत्यासंबंधीं सरकारवर टीका* करणें म्हणजे इंडियन पिनल कोडाच्या १२४ अ कलमाखालीं गुन्हा करणें नव्हे. सरकारच्या कृत्यावर टीका करण्यास सरकारनें कायद्यानेंच मुभा ठेविली आहे आणि माझी बक्षिसाबद्दलची टीका प्रत्यक्ष सरकारवर नसून सरकारच्या कृत्यांवरच आहे असें मी आपणांला सांगतों.

यानंतर आपण माझ्या लेखामधील पुढील भागाकडे वळूं. पुढील भागाचे मीं तीन पॅरिग्राफ केले आहेत व त्या तीन पॅरिग्राफांत दोन मुद्दयांचें विवेचन केलें आहे. पहिला मुद्दा मी आपणाला सांगितलाच आहे. लेख तुटक तुटक न वाचतां समग्र वाचला पाहिजे. अशा दृष्टीनें आपण तो लेख वाचला तर मीं सरकारच्या कृत्यावर फक्त टीका केली आहे व फितुरीबद्दल प्रश्न येतो त्या ठिकाणीं सरकारबद्दल अप्रीति उत्पन्न करण्याऐवजीं सरकारला मदतच केली आहे अशी आपली खात्री होईल. दुसरा मुद्दा सभांबद्दल होय. या बंगालमध्यें भरलेल्या सभा आहेत. या सभांमध्यें, मुजफरपुरप्रकरणाबद्दल खेद व्यक्त केला

होता व ही त्या लोकानीं एक स्तुत्य गोष्ट केली. पण खेद व्यक्त करून न थांबता सरकारनें दडपशाहीचें धोरण अंगीकारावें, म्हणून ते सरकारला विनंति करू लागले त्या वेळेला मात्र ते चुकले. ही त्यांची चुकी त्यांच्या लक्षात आणून देणें हे आम्हा वर्तमानपत्रकाराचे कर्तव्य होय. कांहीं विशिष्ट लोक सभा भरवून सरकारने जुलमी राज्यपद्धति स्वीकारावी म्हणून ठराव पास करतात त्या वेळेला सरकार ऐको किंवा न ऐको सरकारच्या डोळ्यापुढें खरी स्थिति मांडणे हे हिंदुस्थानातील प्रत्येक विचारी मनुष्याचें कर्तव्यकर्म आहे असें मला वाटतें व हेच मी केले आहे. देशाच्या फायद्यासाठीं लेख लिहिणे हेच वर्तमानपत्राचें कार्य होय. असले हे सभा भरविणारे लोक लोकांचे खरे पुढारी नाहींत, त्यांच्यावर विश्वास ठेवून सरकारने फसू नये व लोकांवर दडपशाहीचा अमल गाजवू नये, अशा तऱ्हेचा योग्य सल्ला सरकारी अधिकाऱ्याना देणें हे प्रत्येक वर्तमानपत्रकर्त्याचें कर्तव्य आहे. लोकांना कांहीं तरी द्या; लोक फार दीनपणें आणि कायदेशीर रीतीनें स्वराज्याची मागणी करीत आहेत; या प्रसंगीं लोकांना कांहीं हक्क मिळणे फार जरूर आहे. शेतकरी, कामकरी व भिकारी कधी हक्कासाठी भांडत नसतात; पण आज हिंदुस्थानांतील सर्व सुशिक्षित लोक कांहीं तरी राजकीय हक्क मिळविण्यासाठीं एकसारखा कटाक्ष करीत आहेत, इकडे सरकारनें लक्ष पुरवावें. जे हक्क आमचे आहेत आणि त्यांच्याबद्दलची योग्यता आम्हीं सिद्ध केली आहे ते आम्हाला मिळालेच पाहिजेत आणि शिक्षणानें ज्या हक्कासाठीं भांडण्याला आम्हाला शिकविलें आहे ते जर सरकार आम्हाला देईल तरच तें न्यायी सरकार होय. सरकारने आम्हाला शिक्षण दिलें आहे आणि त्या शिक्षणानेंच आमचे हक्क आम्हाला पाहिजेत असे आम्हाला शिकविलें आहे; पण ते देणें सरकारच्या स्वाधीन आहे व म्हणूनच अशा आणीबाणीच्या वेळीं लोकांवर दडपशाही न करता त्याने हक्क त्यांना द्यावे, असें सरकारला सांगणें हे वर्तमानपत्राशिवाय दुसऱ्या कोणाचें काम आहे! आणि तेंच मीं केले आहे. मला हिंदुस्थानची वस्तुस्थिति माहीत आहे. मी हिंदुस्थानचा रहिवाशी आहे; मला माझ्या देशबांधवांची अंतःकरणें समजतात. आम्ही जितके आमच्या लोकांमध्यें मिसळतों तितके सरकारी अधिकारी मिसळत नाहींत आणि आम्हाला जितके आमच्या देशामधील लोकांचे विचार कळतात तितके सरकारी अधिकाऱ्याना कळत नाहींत. त्यांना लोकांची स्थिति

जी कांहीं समजणार ती सरकारी रिपोर्टांवरूनच होय. पण आमचा लोकांशीं प्रत्यक्ष संबंध येतो. आणि आमच्या मतांना व विचारांना सरकारी अधिकाऱ्यां-*पेक्षां किंवा राजेरजवाड्यांपेक्षां अधिक महत्त्व येतें. सरकारनें दडपशाहीचें धोरण* स्वीकारूं नये, असें आम्ही उगीच म्हणत नाहीं; याला कांहीं कारणें आहेत. लोकांची स्थिति आम्हांलाच माहीत आहे. ते किती असंतुष्ट झाले आहेत याची बरोबर कल्पना आम्हांलाच आहे, म्हणून आम्हींच ती सरकारला कळविली पाहिजे आणि तीच मीं कळविली आहे. लोकांत असंतोष माजला आहे, आपण कर्झनशाहीची दडपशाही स्वीकारूं नका, अशी मसलत मीं सरकारला दिली आहे, हा जर गुन्हा असेल तर तो मीं केला आहे. हा जर राजद्रोह असेल तर तो मीं पसरविला आहे. पण माझी अशी खात्री आहे कीं आपण असें कधींहि म्हणणार नाहीं.

आपण विचार करा कीं, लोकांमध्यें फार तीव्र असंतोष माजला आहे असें मीं काय म्हणून ह्मटलें ? लोकांची खरी स्थिति सरकारला नीट समजली तर लोकांचा फायदा होऊन सरकारचें त्यांत हित होईल म्हणून. याखेरीज कांहीं हेतु सदर लेख लिहिण्यामध्यें माझा असेल तर मीं सरकारबद्दल अप्रीति उत्पन्न केली हें उघड होईल. पण मला असें वाटत नाहीं कीं लोकांत असंतोष आहे असें मीं सरकारला सांगितलें म्हणजे मीं राजद्रोह केला असें म्हणण्या-इतका सरकारचा न्याय अनुदार होईल. आणि म्हणून सरकार इतकें निष्ठुर, अनुदार आणि अन्यायी होणार नाहीं अशी माझी खात्री आहे.

यानंतर दुसरा एक प्रश्न उद्भवतो. लोकांत असंतोष उत्पन्न झाला आहे-सरकारची बाजू लोक हळू हळू सोडीत आहेत, असें आम्ही म्हणतों हें कशावरून ? लोक सरकारपक्षाचे नाहींत असें म्हणण्याला आमच्याजवळ काय पुरावा आहे ? मी म्हणतों कीं हा पुरावा लोकमत होय. लोक सरकारच्या बाजूचे आहेत कीं नाहींत हें लोकमतावरून ठरवावयाचें. माझी लोकमताबद्दलची कल्पना ॲड-व्होकेट जनरल मि० ब्रॅन्सन याच्या मताहून भिन्न आहे याबद्दल मला फार वाईट वाटतें. सदर लेखांत प्रदर्शित केलेलें लोकमत सात दिवसाच्या मुदतीचें आहे-मुजफरपुर येथें अनिष्ट प्रकार घडून आल्यानंतर कांहीं दिवसांनीं मी लोकमत पाहूं लागलों व आठ मेपासून पंधरा मेपर्यंतचा आपला अनुभव मीं आधार म्हणून पुढें ठेविला. माझ्या लोकमताचा प्रश्न फक्त सात दिवसांचाच आहे हें

मी ॲडव्होकेट जनरल मि० ब्रॅन्सन याना फिरून एकदा बजावून सांगतो व या सात दिवसातच प्रदर्शित केल्या गेलेल्या लोकमतावर मीं चर्चा केली आहे.

पण तें लोकमत तरी काय आहे? हिंदुस्थान देशात जीं जीं वजनदार वर्तमानपत्रें आहेत व ज्या ज्या प्रसिद्ध सभा भरविल्या गेल्या आहेत, त्यावरूनच मीं लोकमत ठरविलें आहे. मीं लोकमत शक्य तितक्या सर्व साधनाचा उपयोग करून ठरविलेलें आहे. लोकमत बाहेर पडण्याचे मार्ग दोनः-एक जाहीरसभाचा, त्याबद्दल आपण प्रथम विचार करू. या दुःखप्रदर्शनाच्या जाहीर सभा कोणत्या ठिकाणीं व किती भरल्या आहेत? पधरा दिवसाच्या अवधींत सुमारें दोन किंवा चार यापेक्षा अधिक सभा दु.खप्रदर्शनार्थ भरल्या नाहींत. हा सभाचा आकडा मीं सरकारला कळविला आहे. यात माझा दुसरा कोणताहि हेतु नव्हता. मि० ब्रॅन्सन याना आपण मनकवडे असल्याचें भासत असल्यामुळें दुःखप्रदर्शनार्थ दोनचार सभा झाल्या याबद्दल माझ्या मनात आणि लेखात आनद वास्तव्य करीत आहे असें ताडल्याचें त्यानीं काल आपल्या भाषणात सागितलें; पण हें एक आश्चर्यच ह्मणावयाचें! दुसऱ्याच्या अतःकरणात ब्रॅन्सन साहेब शिरू शकतात काय? होय, असेल कदाचित्, नाहीं कोणी ह्मणावें? माझ्या मनात काय आहे तें जाणण्यासाठीं ब्रॅन्सनसाहेबानीं माझ्यावर मेस्मेरिझमचा प्रयोग कशावरून केला नसेल? पण मि० ब्रॅन्सन ह्मणतात याप्रमाणें दुःखप्रदर्शनार्थ दोनचार सभा झाल्या त्याबद्दल मला आनद वाटला नाहीं, खरें पाहू गेलें तर मला त्याबद्दल दु.खच वाटलें. दुःखप्रदर्शनार्थ दोन चारच सभा झाल्या असे ह्मणून लोकामध्यें असतोष किती माजला आहे हे मला सरकारला दाखवावयाचें होतें. सभा दोनचारपेक्षा अधिक झाल्या असून त्याचा दोनचार आकडा मीं केला आहे असें मुळींच नाहीं. जितक्या सभा झाल्या तितक्या मीं सरकारपुढें माडल्या, यात थोडक्या सभा झाल्याबद्दल मला आनद झाला हे कसे सिद्ध होतें? (लेखातील आणखी एक भाग वाचून दाखवून,) असे मीं लिहिलें आहे त्या अथा सभा थोड्या झाल्या ह्मणून मीं आनद मानतों हे सभवत नाहीं. मला खरोखर आनद झाला असता तर मीं हीं वाक्यें लिहिलींच नसतीं. आणि जर मला लोकाना चिथवावयाचेंच होतें तर मग ज्या ह्या दोनचार सभा भरल्या त्याबद्दलहि मीं लेखात उल्लेख केला नसता. अशा तऱ्हेनें मीं सागितल्यानतर सुद्धा मि०ब्रॅन्सनप्रमाणें आपणालाहि

माझ्या मनातील आनंद अजून दिसत आहे काय ? दिसत असेल तर तो कोठें दिसत आहे हें आपण मला कृपा करून सांगा. सभा थोड्या झाल्या म्हणून मला आनंद झाल्याचा जो आरोप मजवर करण्यांत आला आहे तो मी साफ नाकारतों. त्याबद्दलचा पुरावा मीं दिला आहे. पण आणखीहि एक गोष्ट मी सांगतों. आतापर्यंत दुःखप्रदर्शनार्थ भरलेल्या सर्व सभाचा मीं एकसमयावच्छेदेंकरून विचार केलेला नाहीं. फक्त त्या आठवड्यांत घडलेल्य सभासंबंधीं मीं लिहिलें आहे. हे का घडून आलें याबद्दल आपल्याला संशय येईल व सर्व सभाचा उल्लेख मीं एकदम केलेला नाहीं त्या अर्थी सभा कमं व्हाव्या असा माझा हेतु असावा, असें आपण कदाचित् अनुमान काढाल; पण माझें पत्र दर शुक्रवारीं प्रसिद्ध होतें व बुधवारीं मी लिहिण्यास प्रारंभ करितों त्या वेळी अर्थातूच बुधवारपर्यंतच आलेली हकीकत मला आधारभूत घ्यावी लागते. त्याप्रमाणें त्या अवधीपर्यंत जितक्या सभा झाल्या तितक्यांचाच समावेश मीं लेखात केला आहे आणि त्या दोनचारच होत्या. तेव्हा मीं तर्कशास्त्राचा उपयोग केला. माझें तर्कशास्त्र कदाचित् चुकीचें असेल. मी तें बरोबर शिकलोंहि नसेन. पण मला असें वाटलें कीं ह्या दोनचार सभा म्हणजे काय ! मुझफरपुर येथील प्रकार घडल्यानंतर पंधरा दिवसांच्या अवधींत फक्त दोनचारच सभा होतात याचा अर्थ काय ? ही काहीं समाधानकारक गोष्ट नाहीं. याबद्दल प्रत्येकाला वाईट वाटलें पाहिजे. पण गोष्ट जरी वाईट घडून आली असली व त्याबद्दल कितीहि वाईट वाटले तरी ती घडलेली गोष्ट सत्य आहे. निदान मला तरी त्या वेळीं वाटलें कीं असली गोष्ट छपवून उपयोग नाहीं. सदर लेख मीं लिहिला त्या वेळीं दोनचार सभापेक्षां अधिक सभा खास भरल्या असल्या पाहिजेत असें मला वाटलें व अजूनहि तसा भ्रम एकादे वेळीं पडतो. फार वाईट गोष्ट आहे, पण त्याला कोण काय करणार ?

दुःखप्रदर्शनाच्या सभा थोड्या भरल्या हें खरें. पण त्या तरी कोणीं भरविल्या ? त्या सभामधून खरें लोकमत प्रदर्शित झालें काय ? जर मुझफरपुरचा प्रकार अनिष्ट होता असें लोकांना वाटत होतें तर लोकमताचा अवश्य तितका दुजोरा या सभांना मिळाला नाहीं याचें कारण काय ! यासंबंधीं बोलतांना काल ॲडव्होकेट जनरलनीं माझ्या लेखावर बरीच टीका केली आहे. पण मला त्याचें काय ? लेख लिहिण्याच्या वेळीं माझ्या मनाची जी स्थिति होती ती मीं

आपल्यापुढें माडली आहे. ज्यूरीमधील सभ्य गृहस्थहो, ब्रॅन्सन साहेबानीं माझ्या लेखावर कितीहि कडक टीका केली असली, तरी मी माझा योग्य न्याय व निकाल आपल्या हातात दिला आहे असें मला वाटतें.

ज्या वेळीं मी काहीं लिहितों त्या वेळीं मी इतर पत्रामधील तारा आधारभूत समजतों. आणि माझ्या असें वाचनात आलें आहे कीं, पुस्तकातून घेतलेले उतारे कायद्यानें बाधक होत नाहींत. अशा तऱ्हेनें लिहून मीं हिंदुस्थानातील काहीं सद्गृहस्थाची बदनामी केली आहे असेंहि कालच्या ब्रॅन्सन साहेबाच्या भाषणात ध्वनित झालें आहे. पण अशी स्थिति नाहीं. आणि ती जरी असली तरी त्यात सरकारवर हल्ला केल्याचा आरोप मजवर कसा शाबीत होतो ? ज्या तऱ्हेनें या सभा भरविण्यात आल्या त्या तऱ्हेवर मीं टीका केली आहे व तशी टीका करण्याची कायद्यानें पूर्ण मोकळीक ठेविली आहे.

हें माझ्या हातातील पुस्तक सर हेनरी कॉटन यानीं लिहिलें आहे. याचे नाव 'New India' असें आहे. आपल्याला हे पुस्तक कितपत आवडेल किंवा पटेल याची मला शका वाटते. कारण इंग्लडमधील काहीं लोकाना सर हेनरी कॉटनचे विचार अलीकडे आवडत नाहींसे झाले आहेत. ( हे बडे राजे आणि महाराजे सभा भरवितात त्या वेळेला लोकाचे खरे मत ते सरकारपुढें माडीत नाहींत, अशा आशयाचा उतारा वाचून दाखवून,) हे कॉटन साहेबाचें मत आहे. मग दुःखप्रदर्शनाच्या चारपाच सभा खऱ्या लोकमताच्या निदर्शक नाहींत असें मी म्हटलें तर बड्या राजाची आणि महाराजाची मी बेअदबी केली असें होतें काय ? ( उत्कृष्ट कारणें सागून आपण सर्वांच्या मनावर चागलाच परिणाम केलेला आहे तो राजकीय वादविवादाच्या पुस्तकातील उतारे वाचून दाखवून आपण वाया जाऊ द्यावा असें मला वाटत नाहीं, असें येथें जस्टिस डावर यानीं सुचविल्यावर,) माझा हे सर्व सागण्यातील हेतु इतकाच आहे कीं, ब्रॅन्सन साहेब ह्मणतात त्याप्रमाणें मी राजेरजवाड्याची बेअदबी केली नाहीं. मला सरकारला येवढेंच सागावयाचें होतें कीं, यासारख्या सभामधून जे ठराव पास होतात ते सरकारनें लोकमत ह्मणून समजू नये.

लोकात असतोष किती माजला आहे, हें सरकारला सागावयासाठीं मीं पुढें आणखी दोन उदाहरणें माडलीं आहेत. त्यापैकीं एक, बगालमध्यें सध्या बॉबप्रकरणासाठीं पकडलेल्या लोकापैकीं काहींच्या जबान्या हें होय. दुसरें उदा-

हरण देशभक्त सुब्रह्मण्य शिव यांचा जाब. हीं दोन्ही उदाहरणें माझीं स्वतःचीं नाहींत; यांमधील भाषा व लेख माझीं नाहींत; त्या अर्थी ह्या जबान्या देण्यांत माझा कांहीं वाईट हेतु होता असें आपणांला ह्मणतां यावयाचें नाहीं. त्या आठवडयाचीं वर्तमानपत्रें जर आपण वाचाल तर त्यांमध्यें बंगाली तरुणांची कोर्टांतील उत्तरें छापलेलीं आपल्याला आढळून येतील. तींच उत्तरें मीं आपल्या पत्रांत दिलीं आहेत. आणि तीं उत्तरें दिलीं आहेत, यावरूनच सरकारबद्दल अप्रीति पसरविण्याचा माझा उद्देश स्पष्ट होत आहे असें ॲडव्होकेट जनरल यांनीं काल सांगितलें. पण दुसऱ्याचे विचार छापल्याबद्दल जर वर्तमानपत्रकारांना जबाबदार धरावयाचें असेल तर फिरून मी असें म्हणतों कीं, आह्मा वर्तमानपत्रकारांना आपलीं वर्तमानपत्रें बंद ठेवणेंच प्राप्त आहे. लोकांत असंतोष खवळला आहे हें मला सरकारला कळवावयाचें होतें आणि त्याबद्दल पुरावा देण्यासाठीं मीं हीं कलकत्यांतील तरुणांचीं उत्तरें आपल्या पत्रांत दिलीं. अशा तऱ्हेचा माझा उद्योग होता; पण ह्याच उद्योगाला आपण राजद्रोह ठरविणार !

ज्या कांहीं निरनिराळ्या चारपाच सभा भरविण्यात आल्या, त्यांत खरें लोकमत प्रकट केलें गेलें नाहीं हें मला सांगावयाचें होतें. दुःखप्रदर्शनार्थ भरविलेल्या सभा अशा प्रकारें भरल्या आणि कोर्टांतील गुन्हेगारांचीं उत्तरें अशा प्रकारचीं आहेत हेंच मीं आपल्या पत्रांत लिहिलें आहे. सरकारला जर लोकांच्या मनातील हृद्गत पाहावयाचें असेल तर तें या लेखात मीं प्रतिपादलेलें आहे तें सरकारनें पाहावें, खरी स्थिति समजून घ्यावी, लोकांमधील असंतोष शांत करावा, रागास आणि हट्टास पेटून लोकांच्या दुःखाचीं कारणें अधिक वाढवूं नयेत व लोकांना कांहीं तरी राजकीय हक्क द्यावे, हाच माझा सदर लेख लिहिण्यांतील निष्कलंकित हेतु. यांत मीं राजद्रोह काय केला ? मीं येवढा सद्धेतु मनांत बाळगिला आणि त्याबद्दल तुम्हीं मला राजद्रोही म्हणणार ! ज्यूरीमधील सभ्य गृहस्थहो, मी सरकारविरुद्ध राजद्रोह पसरवीत नव्हतों, थांबवीत होतों. आणि अशा तऱ्हेनें सरकारला मदत करणाऱ्याला जर तुम्ही गुन्हेगार म्हणून ठरवाल तर तुमच्याच हितासाठीं धडपडणाऱ्या देशबांधवाला तुम्ही शिक्षा द्याल असें होत आहे, याचा तुम्हीच विचार करा. लोकांवर दडपशाही करण्याचें धोरण चालू ठेवावें, असा अखेर सरकारच्या बोकांडीं

बसणारा सल्ला काय मीं सरकारला दिला ? मग सरकारचा शत्रु कोण ठरतें ? मीं कीं राजे महाराजे ?

असतोषाचें निवारण करण्यास मीं सरकारला स्वराज्याचा उपाय सांगितला आहे. स्वराज्यापर्यंत आमची धाव आहे, हें आमचें अंतिम साध्य आहे. हें अंतिम साध्य ठेवण्याबद्दल आज कित्येकांचा वाद असला तरी आम्हां सर्वांच्या मते आज आम्हाला कांहीं तरी हक्क पाहिजे आहेत हें सिद्ध आहे. पण मी म्हणतों, आम्ही आज स्वराज्य हेंच आमचे अंतिम साध्य असें म्हणण्याला काय हरकत आहे ? आपल्या साध्या नेहमींच्या आयुष्यक्रमांत आपण असें पाहतों कीं, एकाद्याला कांहीं मागावयाचें असेल तर तो सटरफटर न मागता शक्य तितकी उत्तम गोष्ट मागून पाहतो, त्यांतीलच हा आमचा प्रकार आहे. मागणें येवढेंच सरकारनें आमच्या स्वाधीन ठेवलें आहे, मग स्वराज्यासारखी अति उत्तम गोष्ट आम्हीं का मागूं नये ? द्यावयाचें किती याबद्दल विचार सरकार करील ! त्याबद्दल आम्हीं नेटिव्हांनीं आपलें डोकें काय म्हणून शिणवावें ? सरकारनें स्वराज्य सगळें द्यावे किंवा अर्धे मुर्धे द्यावें, आम्ही सरकारजवळ सगळें स्वराज्य मागणार !

माझ्या लेखावर दुसरा एक असा आक्षेप आहे कीं, मीं हिंदुस्थानची तुलना रशियाशीं केली आहे. पण ती कशासाठीं ? रशियामध्यें जरी अशी अराजक स्थिति माजली आहे, तरी देखील रशियानें आपल्या लोकांना ड्यूमा सभा दिली हें दर्शविण्यासाठीं. रशियाच्या आणि इंग्लिशांच्या राज्यपद्धती मध्यें साम्य आहे असें लोकांच्या मनामध्यें भरवून देण्याचा माझा मुळींच मानस नव्हता, रशियांत बॉंब गोळे प्रथमतः झाले व त्यानंतर रशियाला ड्यूमा सभा मिळाली. तीच स्थिति इंग्लंडची होऊं नये असा माझा हेतु होता. बॉंब गोळ्यापर्यंत हिंदुस्थानांत मजल येऊन ठेपली, आतां तरी इंग्लिशांनीं हिंदुस्थानांतील लोकांना हक्क द्यावे हें मला सरकारला सांगावयाचें होतें. आपणाला जर सत्य पाहिजे असेल तर तें हें आहे. एकाच शब्दाचे अनेक अर्थ होऊं शकतात आणि कुशल टीकाकार ते तसे असल्याबद्दल सिद्धहि करून दाखवितात, पण माझें सत्य हें आहे इतकेंच मी आपणाला सांगतों.

आपल्या लेखांत मीं रोमेशचंद्र दत्त यांबद्दलहि कांहीं उद्गार काढले आहेत. त्याबद्दल बोलतांना मि॰ दत्त यांनीं बेअब्रू केल्याबद्दल काळावर

फिर्याद करावी असेंहि ॲο जοनीं सुचविलें आहे; पण माझी खात्री आहे कीं, मिο दत्त किंवा सरकार कोणीच असल्या तऱ्हेचा खटला पुढें आणणार नाहीं. टाइम्स ऑफ इंडिया, बॉंबे गॅझेट आणि ॲडव्होकेट ऑफ इंडिया यांमध्ये एका गृहस्थानें इंग्लंडांत मिο दत्त यांच्या घेतलेल्या भेटीचा सारांश दिलेला आहे. त्यामध्ये दत्त साहेब यानीं सध्यांच्या परिस्थितीबद्दल माझ्या-प्रमाणेंच आपले विचार सांगितलेले दिसतात. हें मिο दत्त याचें म्हणणें आहे; माझें नव्हे. मिο दत्तसाहेब काय म्हणाले याची फक्त तार मीं आपल्या पत्रांत दिली आहे आणि मला हें सांगावयाला फार समाधान वाटतें कीं, मिο दत्त माझ्या बाजूचे आहेत. मिο दत्त म्हणतात, "हिंदुस्थानांतील असंतोषानें बॉंबगोळे उत्पन्न केले आहेत व ते नाहींसे करण्याला लोकाना स्वराज्यासारखे हक्क देणें हें उरलेलें एकच एक साधन आहे."

याशिवाय मीं आणखी एका मुद्द्याचें विवेचन केलें आहे. तो असा कीं बॉंबगोळे फेकणाराना अनार्किस्ट ह्मणतां येईल कीं नाहीं ? एका दृष्टीनें पाहूं गेलें तर हे बॉंबगोळे फेकणारे अराजक ठरतात. पण मीं आपल्या लेखांत अनार्किस्ट या शब्दाचा फक्त धात्वर्थक दृष्टीनें विचार करून या बॉंबगोळे फेकणारांना अराजक ह्मणतां येणार नाहीं, असें प्रतिपादिलें आहे. त्याना स्वराज्य पाहिजे आहे, अराजक पद्धति नको आहे. आणि ह्मणूनच त्याना अनार्किस्ट ह्मणता येणार नाहीं.

लेखाच्या शेवटीं मीं महाराजाच्या आणि प्लॅंटर्स असोसिएशनच्या सभा-संबंधीं लिहिलें आहे. त्यांत मीं असे म्हटलें आहे कीं, या सभा झाल्या हे ठीक झालें व हे ठराव करणारे निघाले हेंहि कांहीं वाईट नाहीं; पण ते आज पुढें आले आहेत त्यापेक्षां ते थोडे आधीं पुढें आले असते तर अधिक उत्तम झालें असतें. त्यानीं ह्या सूचना सरकारला केल्या त्या आधीं केल्या असत्या तर त्या अधिक उपयोगी झाल्या असत्या. लोकामध्यें असंतोष वाढत आहे ही गोष्ट या मुत्सद्द्यांना ठाऊक होती. व हा असंतोष कां पसरत आहे याचीं कारणेंहि त्यांना माहित होतीं. हे सर्व या वडया लोकांना ठाऊक असतां तो असंतोष आणि तो असंतोषाचीं कारणें त्यानीं सरकारच्या कानांवर आधींच कां घातलीं नाहींत ? बॉंबगोळे उडून गेल्यानंतर पूर्वी अशी स्थिति होती आणि तशी स्थिति होती व सरकारनें ती आतां अशी सुधारावी आणि तशी सुधारावी अशी

सूचना करण्याचें काय प्रयोजन आहे ?

सदर सूचना करणारासंबधीं लिहितांना मीं युरोपियन डिफेन्स असोसिएश नच्या सभेसंबधीं लिहिलें आहे. या सभेने सरकारला कित्येक मार्ग सुचवून उपदेश केला आहे. उपदेश हा केव्हांहि झाला तरी आणि कोठूनहि आला तरी ग्राह्यच आहे पण या सभेचा हा उपदेश अस्थानीं आहे असें मी सिद्ध करून दिलें आहे, यात काय चुकलं ? योग्य वेळीं उपदेश न करितां भलत्या वेळीं उपदेशाचा आव घालणें ह्मणजे युरोपियन डिफेन्स असोसिएशनच्या ऐवजी युरोपियन डिफीट असोसिएशन असें आपल्याला ह्मणवून घेणें होय. या ठिकाणीं Defeat शब्दाचा अर्थ लढाईमध्ये पराजय होणें असा घेऊं नका; कारण असा अर्थ लेख लिहिण्याचे वेळीं माझ्या मनामध्ये नव्हता. Defeat ह्मणजे आपल्या प्रयत्नात अपयश येणें असा अर्थ धरून मी Defence आणि Defeat या शब्दावर कोटि केली आहे. व ह्मणूनच यु० डिफेन्स असोसिएशनची सभा आपलें हेतु मनात बाळगून लोकाना या वेळीं राजकीय हक्क देण्याला सरकार-ला सांगणार नाहीं तर ही युरोपियन डिफेन्स असोसिएशनची सभा आपलें कर्तव्य करणार नाहीं असें होणार आहे, असें मी आपल्या लेखात ह्मटलें आहे. युरो पियन डिफेन्स असोसिएशनचा लढाइमध्यें पराभव होईल असें म्हणण्याचा माझा हेतु नव्हता. जरा वेगळी दृष्टि करून आपण माझ्या लेखाकडे पाहिलें ह्मणजे माझ्या लेखाची सत्यता आपल्याला पटल्यासेरीज राहणार नाहीं.

सर्व लेख लिहिण्यामध्ये लोकानीं दुराग्रहाच्या मार्गाचें अवलंबन करावें, असा माझा हेतु नसून सरकारनें लोकाना आवडतील असे हक्क देऊन टाकावे हा होता. माझ्या लेखात दुसरीं अशी आणखी पुष्कळ वाक्यें आहेत कीं, त्यावरून माझा हेतु सरकारबद्दल अप्रीति पसरविण्याचा नव्हता असें स्पष्ट सिद्ध होईल. ( काहीं वाक्यें वाचून दाखवून, ) लोकामध्ये ज्याला असंतोष पसर वावयाचा आहे तो अशीं वाक्यें कधींहि लिहिणार नाहीं "अशा कारणासाठीं सरकारनें शांतपणे सध्याच्या परिस्थितीचा विचार करावा व लोकमताप्रमाणें आपलें धोरण ठेवण्याचें मुकर करावें," अशा अर्थाचें एक वाक्य माझ्या लेखात आहे. ज्याला सरकारबद्दल राजद्रोह उत्पन्न करावयाचा आहे तो सर-कारला असा सल्ला देईल काय ? माझा निर्मळ हेतु सिद्ध करण्यासाठीं याशिवाय आणखी पुष्कळ पुरावा माझ्या लेखात आहे, पण त्याबद्दल मी विस्तृत विवेचन

करीत नाहीं. मला आपले बोलणें पुढें चालविण्याचा कंटाळा येऊं लागला आहे. कारण जें काहीं मला बोलावयाचें होतें तें सर्व मी आपणांपुढें बोलून टाकलें आहे. ज्यूरीमधील सभ्य गृहस्थहो, सरकारचा मजवर ज्या लेखाबद्दल विशेष कटाक्ष आहे, तो लेख मीं आपणाला पूर्ण समजावून सांगितला आहे. व येवढेंच जरी मीं सांगितलें तरी तेवढेंहि मला न्याय मिळण्याला पुरें आहे असें मला वाटतें.

बर्क, गिबन, कार्लाइल, ग्लॅडस्टन वगैरे थोर थोर महात्म्यांसंबंधीं मीं जे उद्गार काढले आहेत, ते आपण लक्षांत घ्या. जर मला राजद्रोह पसरवावयाचा असता तर माझ्या लेखांमधील भाषापद्धति याहून फार भिन्न झाली असती. मीं दुसऱ्या एका लेखांत मि० हिंडमन यांचें मत सरकारपुढें मांडलें आहे. सरकारला उपदेश करण्याची हीच एक नाजूक वेळ आहे असा उपोद्घात करून मीं हा अग्रलेख लिहिला आहे. सरकारला खरें लोकमत कळावें हा माझा हेतु होता आणि तो मीं यथाशक्ति आणि यथामति बजाविला आहे. ज्यूरींतील सभ्य गृहस्थहो, माझें हे असें हृदयाविष्करण आहे.

(उपाहारानंतर,) मी मघां हिंडमनसंबंधीं बोलत होतों, तो हिंडमन साहेबांच्या लेखाचा उतारा मी २९ मेच्या अंकांत दिला आहे. (उतारा वाचून दाखवून,) देशाची खरोखर स्थिति काय आहे आणि या वेळीं सरकारनें दडपशाहीचें धोरण अंगिकारलें तर त्याचा परिणाम काय होईल याबद्दलचें आपलें मत सरकारला कळविणें हें प्रत्येक वर्तमानपत्रकर्त्याचें काम आहे. किंबहुना सरकारला सल्ला देण्यासाठींच वर्तमानपत्रांचें अस्तित्व आहे असें मला वाटतें.

माझा राजद्रोहाचा हेतु शाबीत करण्यासाठीं सहा जूनचा अंकहि सरकारतर्फे पुढें करण्यात आला आहे आणि त्यावरून माझा लिहिण्याचा रोंख कसा असतो हें ज्यूरीमधील लोकांनीं ताडावयाचें आहे. या लेखांत 'इंग्लिश लोक केर हार्डी साहेबांचें ऐकत नाहींत काय ?' असें एक वाक्य आहे. हें वाक्य रशियाप्रमाणें हिंदुस्थानांत बॉब फेंकण्याला उद्युक्त करणारें आहे असें सरकारतर्फे सांगण्यांत आलें आहे. पण तें तसें नाहीं हें आपल्या तेव्हांच लक्षांत येईल. डंकन येथें केरहार्डी साहेबांनीं जें भाषण केलें त्याची माझा लेख फक्त पुनरावृत्ति आहे. त्या भाषणाकडे सरकारनें लक्ष दिलें असतें तर हा बॉबचा अनर्थ टळला असता. बॉंबसारखे प्रकार घडावे अशी माझी मुळींच इच्छा

नाही. तर ते घडू नयेत म्हणून केरहार्डी साहेबांच्या भाषणाकडे सरकारने लक्ष पुरवावें असें माझे मत होतें. हा राजद्रोह आहे काय ? तो तसा असता तरी तो राजद्रोह स्पष्ट बोलून दाखविण्याला मीं कमी केलें नसते. माझ्या प्रामाणिक समजुती जशा आहेत तशा मी सरकारपुढें मांडल्या आहेत आणि यात मीं राजद्रोह केला आहे असे मला वाटत नाहीं. लोकांचें गाऱ्हाणें मी आपल्या लेखात सरकारपुढे मांडलें आहे. अशा रीतीने सरकारचें लक्ष लोकांच्या गाऱ्हाण्याकडे जो लेखक वेधतो तो राजद्रोह कधींहि करीत नाहीं हे आपण लक्षात ठेविलें पाहिजे. मीं लेखात एके ठिकाणीं असे म्हटलें आहे कीं, आम्ही आपली चळवळ कायदेशीर मार्गानेंच चालविणार. या माझ्या 'कायदेशीर मार्गानेंच'मधील 'च'कारानें बेकायदेशीर मार्ग मला पसंत नाहीत हे उघड होत नाहीं काय ? ज्या लेखकाला सरकारबद्दल अप्रीति उत्पन्न करावयाची आहे आणि इंग्रजी राज्याची इमारत बुडवून टाकावयाची आहे, तो असलीं वाक्यें कधींहि लिहिणार नाहीं. असलीं वाक्यें इंग्रजी राज्यात राजद्रोही ठरतील तर तो न्याय नव्हे. या लेखामध्यें अशीं कांहीं वाक्ये आहेत कीं, त्यात लेखकाचें मन उघड झालेलें स्पष्ट दिसत आहे, इकडे आपण लक्ष पुरवा, लेखकाचें हृद्गत समजून घ्या आणि त्याचीं मतें प्रामाणिक आहेत कीं नाहींत हें पाहा. माझ्या लेखातील बर्क आणि कार्लाइलसंबंधीं माझे उद्गार आपण लक्षपूर्वक वाचा अशी मी आपल्याला पुनः विनंति करतों. ते वाचून आप त्याला लेखकाचें हृदय समजून येईल. या सर्व पुराव्यावरून लेखकाचा हेतु राजद्रोही होता असें जर तुम्हाला वाटेल तर त्याबद्दल शिक्षा भोगण्याला मी तयार आहे. पण आपणाला असें कसें वाटेल ? बर्क, कार्लाइल, ज्याला आवडतात तो राजद्रोह कसा पसरवील ? राजद्रोह पसरवू इच्छिणारा मनुष्य एकदम बाँबकडे धाव घेईल, तो बर्क कार्लाइल्कडे पाहणार नाहीं. बर्क आणि कार्लाइलसारखे लेखक मला शाळा-कॉलेजात असता फार आवडत असत. त्यानीं प्रतिपादन केलेलीं उदात्त तत्त्वें आणि गंभीर कल्पना माझ्या मनामध्यें घोळत असतात. मग मी राजद्रोही कसा ! बर्कचें मन आणि माझें मन एक आहे; कार्लाइलचें मन आणि माझे मन एक आहे. मग मी राजद्रोही कसा ! बर्क-कार्लाइल्सारख्या लेखकाकडे लक्ष पुरवा असे मी स्वदेशबांधवाना सागतों, मग मी राजद्रोही कसा ! अशा तऱ्हेनें बर्क-कार्लाइलसारख्या तत्त्व-

वेत्त्यांबद्दल ज्याला इतका आदर आहे, तो इंग्रजी राज्याबद्दल अप्रीति उत्पन्न करण्याला प्रवृत्त होईल हें *मला सर्वस्वीं अशक्य वाटतें.*

आता १५३ अ कलमासंबंधीं माझ्या लेखामध्ये जे कांहीं उद्गार आहेत त्यासंबंधीं मी आपल्याला थोडेंसें सांगतों. वास्तविक पाहूं गेलें तर १५३ अ कलम शाबीत होण्यासाठीं सरकारतर्फे फारच थोडा पुरावा पुढें करण्यांत आला आहे. माझा जातींजातींमध्यें वैमनस्य उत्पन्न करण्याचा व शांतता नष्ट करण्याचा मुळींच उद्देश नव्हता व मीं तसें केलेंहि नाहीं. आपण माझे लेख लक्षपूर्वक वाचा; त्यांत माझा निर्मळ हेतु आपणाला दिसून येईल. मला जातींजातींत द्वेष माजवावयाचा नाहीं; सर्व जातींत एकी उत्पन्न व्हावी अशी माझी इच्छा आहे. मीं इंग्लिश जातीबद्दल तिरस्कार दर्शविला नाहीं; आम्हा वर्तमानपत्रकाराना राजकीय विषयावर नेहमीं लिहावें लागतें व म्हणूनच इंग्लिश जातीबद्दल लिहिण्याचा प्रसंग आम्हाला वारवार येतो. लोकांत असंतोष माजला आहे तो शांत करण्यासाठीं इंग्लिश जातीनें कांहीं तरी केलें पाहिजे, असें देखील आम्हीं सांगावयाचें नसेल तर मग आम्हीं सर्व बाबतींत मुग्ध राहणेंच बरें. आमचा राजकीय प्रश्न हा इंग्लिश आणि हिंदु या दोन जातींमधील नसून राज्यकर्ते आणि प्रजाजन या दोन जातींमधील आहे. इंग्लिश जात कशीहि असली तरी आम्हावर राज्य करणारी जात आज आम्हाला हक्क देणारी पाहिजे आहे. राज्य करणारी जात इंग्लिशांचीच आहे असें नाहीं. तींत इंग्लिश आहेत, हिंदु आहेत, मुसलमान आहेत व पार्शीहि आहेत. तेव्हां आम्ही वर्तमानपत्रकार राज्य करणाऱ्या जातीविषयीं लिहितों त्या वेळीं आम्ही हिंदु आणि इंग्लिश या जातींमध्यें वैमनस्य कसें उत्पन्न करितों हें मला समजत नाहीं. *आणि शिवाय राज्य करणारी जात इंग्लिश असेल आणि तिच्यावर मीं* टीका केली असेल तरीहि मी दोषी होत नाहीं असें मला वाटतें; कारण ब्यूरॉक्रसीच्या कृत्यांवर टीका करण्याचा लोकांना हक्क आहे. आणि जर *ब्यूरॉक्रसीसंबधानें आम्हांला लिहावयाचें* आहे तर *त्या ब्यूरॉक्रसीतील* मंडळींवर टीका न करून आमचें कसें भागेल ? आणि हीच ब्यूरॉक्रसी आज जरी हिंदु लोकांची असती आणि तिनें जर या ब्यूरॉक्रसीप्रमाणें आपलें धोरण ठेवलें असतें तरी *आम्हीं त्या नेटिव्ह ब्यूरॉक्रसीवरहि अशीच टीका केली* असती. अशा दृष्टीनें आपण माझ्या लेखांकडे पाहाल तर माझा हेतु निर्दोषी

आहे असें सहज आपल्या लक्षात येईल व माझा सदर लेख लिहिण्यामधील उद्देश व प्रयत्न इंग्रज सरकारविरुद्ध राजद्रोह उत्पन्न करण्याचा किंवा जातीं-जातींमध्ये वैमनस्य माजविण्याचा नव्हता अशी आपली खात्री होईल.

ज्यूरीमधील सभ्य गृहस्थहो, माझें भाषण आता बहुतेक संपलें आहे. आपण हें लक्षात ठेवा कीं, मी एक वर्तमानपत्रकर्ता आहे आणि सध्याच्या परिस्थितीवर आपले विचार प्रदर्शित करणें हें माझें कर्तव्यच आहे. मीं कलकत्यात उडालेल्या बॉंबगोळ्यासंबंधी लेख लिहिला आणि त्यामुळेंच माझ्यावर ही फिर्याद झाली अशी माझी समजूत आहे; पण आपण आपल्या मुंबई इलाख्याची परिस्थिति लक्षात घ्या. मुंबई इलाख्यामध्यें अजूनपर्यंत शांतता आहे, कोठें बॉंब गोळे फेकण्यात आलेले नाहींत. हिंदुस्थानात सार्व-त्रिक शांतता जितकी वास्तव्य करीत आहे तितकीच ती मुंबई इलाख्यात पस-रून राहिली आहे याचा आपण विचार करा. मुंबई सरकारनें भीतीनें उगीच गांगरून जाणें चांगलें नव्हे. मुंबईमध्यें सर्वत्र शांतता आहे; पण सरकार जर असे राजद्रोहाचे खटले करील तर मात्र ती शांतता भग्न होण्याचा पुष्कळ संभव आहे. मुंबई इलाख्यात जर बॉंब गोळे फेकण्यात येत असते तर मग मात्र माझ्या लेखाचा एकंदर जनसमहावर वाईट परिणाम झाला असता व मग सरकारनें मजवर खटला केला असता तर मला त्याबद्दल वाईट वाटलें नसतें. पण लोकांची चित्तवृत्ति क्षुब्ध करणार असले खटले करून सरकार आज आपल्या पायावर निरर्थक धोंडा मारून घेत आहे ही मोठी वाईट गोष्ट आहे. आमच्या इलाख्यात खुदीराम बोस अजून उत्पन्न झाला नाहीं; कल-कत्यातील लोकांप्रमाणें मुंबईचे लोक खवळलेले नाहींत. तेव्हा आम्हीं येथील वर्तमानपत्रकारानीं राजकीय विषयावर वाटेल त्या वेळीं कितीहि चर्चा केली तरी त्यामुळें सरकारविरुद्ध काहींहि अनिष्ट परिणाम घडून यावयाचा नाहीं असें मला लेख लिहिण्याच्या वेळीं वाटलें व अजूनहि वाटतें. यावरून मीं लोकांना राजद्रोह शिकविला नाही हें उघड होत आहे. हे लेख मीं सरकारच्या हिता-करिता आणि लोकांच्या सुधारणेकरिता लिहिले आहेत. लोकांत असंतोष आहे आणि तो काय करून सरकारनें नाहींसा करावा हें आम्ही सांगणें हा राजद्रोह होतो काय ? लोकांवर दडपशाहीचा अमल चालवूं नका, असा आम्हा नेटिव्ह पत्रकारांचा एकसारखा कंठशोष सुरू आहे. अशा सल्ल्याचा

कंठशोष राजद्रोहात्मक होत नाहीं असें बेकननेंहि आपल्या ग्रंथांत म्हटलें आहे.

वास्तविक प्रजा राजद्रोह कधींच करीत नाहीं अशी आमची हिंदूंची समजूत आहे व त्याप्रमाणेंच आम्हांला आजपर्यंतच्या सर्व राज्यकर्त्यांनीं वागविलें आहे. पुराणांतरीं श्रीरामचंद्रासंबंधीं एक कथा सांगितलेली आहे. श्रीरामचंद्रासारखा धर्मात्मा राजा अयोध्येवर राज्य करीत होता. तो आपल्या प्रजेला आपल्या अपत्याप्रमाणें वागवी. श्रीरामचंद्र हा ज्याप्रमाणें एकपत्नी-व्रतधारी होता त्याप्रमाणें त्याची पत्नी सीताहि पतिव्रता होती. पण अशी स्थिति होती तरी अयोध्येमधील एका रजकानें राजा श्रीरामचंद्राविषयीं राजद्रोह उत्पन्न करण्याचें मनांत आणलें व हा आपला निंद्य हेतु तडीस नेण्यासाठीं रामचंद्राची पत्नी सीता ही व्यभिचारिणी आहे अशी हूल उठविली. हा त्या रजकानें श्रीरामचंद्राचा केवढा राजद्रोह केला ! पण राजा श्रीरामचंद्रानें या राजद्रोहाबद्दल त्या रजकावर खटला केला नाहीं, कोर्ट बसविलें नाहीं, ज्यूरीकडून दोषी असें म्हणवून घेतलें नाहीं किंवा न्यायाधीशाकडून शिक्षाहि ठोठाविली नाहीं. राजा रामचंद्रानें केलें तें हें कीं हा राजद्रोह त्यानें निमुटपणें सहन केला व त्या राजद्रोहाचें मूळ कारण जी सीता तिचाच त्यानें परित्याग केला ! अशा तऱ्हेची उदात्त राज्यपद्धति इंग्लिश सरकारनें स्वीकारावी. राजद्रोह खटले करून थांबावयाचा नाहीं, तो नाहींसा करण्याला मूळ कारणच दूर केलें पाहिजे. यासाठीं सरकारनें हे असले निष्फळ खटले करूं नये, दडपशाहीचें धोरण अंगीकारूं नये, आम्हां प्रजाजनांना ममतेनें वागवावें, आमची पात्रता असेल ते हक्क आम्हाला द्यावे व असें करून आमचें राष्ट्र युरोपामधील इतर राष्ट्रांप्रमाणें उच्च पदाला नेऊन पोंचवावें ही आम्हां सर्वांची विनंति आहे, हें आम्हां सर्वांचें धोरण आहे. याचाच सरकारनें अवलंब करावा म्हणजे लोकांत संतोष आणि शांतता नांदूं लागेल. कायद्यानें देखील माझा लेख दोषी ठरत नाहीं. सरकारला राजद्रोह नाहींसा करावयाचा असेल तर तो खटल्यांमधून शिक्षा सांगून होणार नाहीं; लोकांना हक्क देऊन होणार आहे.

ज्यूरीमधील सभ्य गृहस्थहो, मीं आपलें म्हणणें आपणांपुढें मांडलें आहे. आतां मजसंबंधींचा न्याय आणि निकाल मी आपल्या स्वाधीन करतों. गुलेम्हानच्या केसमध्यें लॉर्ड फिट्झजेरॉल्ड यांनीं ज्यूरीला उद्देशून सांगितलें आहे

तेंच मी आता आपल्याला सांगत आहें. आपणास कांहीं व्यक्तिविषयक सांगण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. मला मुद्रणस्वातंत्र्याचें संरक्षण झालेलें पाहावयाला पाहिजे आहे. सध्या मुद्रणस्वातंत्र्य पेंचात सांपडलेलें आहे. आपण या खटल्यामध्यें जो निकाल देणार आहा त्यावर सर्व मुद्रणस्वातंत्र्य अवलंबून असून तिकडे देशाचें लक्ष वेधून राहिलें आहे.

आपण मुद्रणस्वातंत्र्याचे पुरस्कर्ते आहा ! आपण जो निकाल द्याल तो मला मान्य आहे. आपली जबाबदारी आपण लक्षात घ्या. आपण मला दोषी ठरविलें तर त्याबद्दल जी शिक्षा होईल ती भोगण्याला मी तयार आहें, पण असें होईल असें मला वाटत नाहीं.

माझें हृदय मी आपणाला मोकळें करून दाखविलें आहे; सदर लेख लिहिण्यामध्यें माझा निर्मळ आणि प्रामाणिक हेतु होता हें मी आपल्याला सांगतों. असें करून, मीं ज्या देशात जन्म घेतला आणि ज्या देशात मी वाढलो, त्या देशाचें मीं हित साधलें आहे. ज्यूरीमधील सभ्य गृहस्थहो, आपण हें लक्षात ठेवा कीं, आपलाहि जन्म याच देशात झालेला आहे. आपल्या मनाची उदात्तता आपण या वेळीं सोडूं नका म्हणजे मला खात्री आहे कीं आपणापासून मला जो निकाल पाहिजे आहे तो मिळेल. मीं आपला लेख आपणाला स्पष्टपणें समजावून दिला आहे व त्यात मला पूर्ण न्याय मिळणार आहे अशी माझी मनोदेवता मला वारंवार सांगत आहे. माझ्या मतें मीं सर्वस्वीं निर्दोषी आहें. मीं माय—देशासाठीं आपले प्राण खर्चविले आहेत आणि असें करण्यांत मीं कांहींहि दोषास्पद गोष्ट केली नाहीं, असे माझें अंत:करण आणि माझ्या अंतःकरणांतील सदसद्विवेकबुद्धि मला ओरडून सांगत आहेत. या माझ्या कार्यामध्यें प्रत्यक्ष न्यायदेवता मला साहाय्य आहे. माझ्या परमप्रिय देशाची उन्नति अशाच तऱ्हेचें वर्तन नेहमीं चालू ठेवण्यासाठीं मला उत्तेजन देत आहे व या कामी परमेश्वर माझा पाठीराखा होईल, अशी माझी खात्री आहे. सदर लेख लिहिण्याच्या प्रसंगीं माझ्या मनात जर कोणता मनोविकार जागृत झाला असेल तर तो इंग्रज-सरकारबद्दल राजद्रोह नसून माझ्या परमपूज्य हिंदुस्थान देशाची एकनिष्ठ प्रीति हा होय. हल्लींच्या परिस्थितींत हिंदुस्थान देशाबद्दल एखाद्या मनुष्याला जितकें करता येणें शक्य असेल तितकें मी करून सोडलें आहे असें मला वाटतें. माझ्या

त्या कृत्याबद्दल माय–देशाला व परमेश्वराला मी जबाबदार धरतों.

जज्जसाहेब आणि ज्यूरीमधील सभ्य गृहस्थहो, माझें बोलणें संपलें. पुढील सर्व प्रश्न आपला आहे. आपण आपली सदसद्विवेकबुद्धि जागृत करा व परमेश्वराचें स्मरण करा. मीं इतकें लांबलचक भाषण करून आपणांला पुष्कळ वेळ तिष्ठत ठेवलें याबद्दल आपण मला क्षमा करा. मी पुष्कळ वेळ बोललों खरा; पण आपण हे लक्षांत ठेवा कीं माझें हें सर्व बोलणें माझ्या मनाची खरी स्थिति आपणाला समजावून सागण्याला अगदीं अवश्य होते. मीं हें केलें नसतें तर आपल्या मते मी कदाचित् दोषी ठरलो असतों व त्यामुळें कोर्टानें मला शिक्षाहि सागितली असती. ही शिक्षा अगदीं थोडी सागण्यांत आली असती तरी तिचा परिणाम इतरत्र फार घडून आला असता! आणि म्हणूनच मीं आपलें म्हणणें आपणापुढे सादर केलें आहे.

जज्जसाहेब आणि ज्यूरीमधील सभ्य गृहस्थहो, इतकें बोलून मी माझा न्याय आणि निकाल आपल्या स्वाधीन करतों, त्याचा आपण योग्य निवाडा करावा.

## न्या० दावर यांचें ज्यूरीस उद्देशून समारोपाचें भाषण.

ज्यूरींतील सभ्य गृहस्थहो, मीं आतां जें सांगणार आहें तें आपण लक्ष देऊन ऐका. काल ज्या वेळीं मीं पाहिलें कीं, आरोपी स्वत: खटला चालवीत आहे, त्या वेळीं मला वाईट वाटलें. मनाची समतोलता सोडून नको त्या गोष्टी बोलण्याकडे विकारवशतेमुळें आरोपीचा कल साहजिकच असतो व त्यामुळें आरोपी आपण होऊन खटला बिघडवून घेईल कीं काय, अशी मला भीति वाटली; पण आतां ती भीति उरली नाहीं. आरोपीनें जितक्या चांगल्या रीतीनें आपलें काम चालविलें, तितक्या चांगल्या रीतीनें दुसऱ्या कोणासहि खटला चालवितां आला असता, असें मला वाटत नाहीं. सरकार व आरोपी या दोघांमध्यें तुम्हाला न्याय करावयाचा आहे; तुमच्या मनांतील वाईट ग्रह व मनोविकार क्षणभर बाजूस ठेवा व या खटल्यांत जें तुम्हीं ऐकलें असेल तेवढ्यावरच आरोपी दोषी किंवा निर्दोषी आहे हें ठरवा. तुमच्यावर व माझ्यावर कायद्याप्रमाणें काम करण्याचा बोजा आहे. या खटल्यांत घडलेल्या गोष्टींसंबंधीं निकाल देण्याचें काम तुमचें आहे. आक्षिप्त लेखांमधील शब्दांचे अर्थ व त्यांचा उपयोग व त्यांचा वाचकांचे मनावर झालेला परिणाम या

सर्व गोष्टींचा विचार तुम्हीं करावयाचा आहे; कायद्याच्या प्रश्नाचा निकाल मी करीन. अॅडव्होकेट जनरल व आरोपी या दोघांचीहि भाषणें तुम्हीं लक्ष देऊन ऐकिलेलीं आहेत; आतां मी सांगतों तें ऐका. तुम्ही अमुक तऱ्हेनेंच निर्णय द्यावा असें माझें मुळींच म्हणणें नाहीं. आरोपीवर दोन निरनिराळ्या कलमा खालीं आरोप ठेवण्यांत आलेला आहे व तीं कलमें तुम्हास अवगत झालेतच. या दोन्ही कलमाखालीं आरोपी दोषी आहे कीं निर्दोषी आहे हें एकदाच ठरवावयाचें नाहीं. प्रत्येक कलमाखालील आरोपाचा निरनिराळा विचार करून प्रत्येकाखालीं आरोपी निर्दोषी किंवा दोषी हे सांगितलें पाहिजे. पहिला आरोप १२४ अ कलमाखालीं लोकामध्यें सरकारविषयीं अप्रीति उत्पन्न केल्याचा आहे. आरोपीनें खटल्यातील लेखांबद्दल संपादक, प्रकाशक व मालक या नात्यानें आपली जबाबदारी कबूल केली आहे व लेख स्वत: लिहिले असेंहि सांगितलें आहे. हिंदुस्थानात कायदेशीर रीतीनें प्रस्थापित झालेल्या राज्याविरुद्ध द्वेष, अप्रीति व असंतोष उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला किंवा नाहीं हें पाहावयाचें आहे. प्रयत्न सफल झाला किंवा नाहीं हा मुद्दा नाहीं. प्रयत्न झाला असला तर तेवढ्यानेंच आरोप शाबीत होतो. द्वेष, तिरस्कार, हे शब्द आम्हां सर्वांस सहज कळतात; अप्रीति शब्दात सरकारविषयीं राजद्रोहाचा समावेश होतो. राजद्रोहाचे मनोविकार लोकाच्या मनात उत्पन्न करण्याचा प्रयत्न आपल्या लेखानीं आरोपीनें केला किंवा काय ते तुम्ही पहा. सरकारच्या कृत्यांवर कडक टीका करण्यास बिलकुल हरकत नाहीं; मात्र लोकांच्या मनात अप्रीति उत्पन्न करण्याचा प्रयत्न नसावा. दुसऱ्या कलमाचा अर्थ अगदींच उघड आहे. प्रजेपैकीं निरनिराळ्या वर्गामध्यें द्वेषभाव उत्पन्न करण्यासारखे आरोपीचे लेख होते कीं काय याचा तुम्ही निकाल करा. युरोपियन व हिंदी या दोन जातीमध्ये सदर लेखामुळे द्वेषभाव उत्पन्न होईल कीं काय याचा विचार करा. १२४ अ कलमाखालीं बरेच महत्त्वाचे निकाल आलेले आहेत. जज स्ट्राची याचा निकाल महत्त्वाचा आहे. १८९८ सालीं या कायद्यात फेरफार झाल्यावरहि कांहीं खटले झालेले आहेत. त्यावरूनहि अप्रीति ( Disaffection ) या शब्दाचा अर्थ नीट ध्यानात येईल. (पुष्कळ उतारे वाचून दाखवून,) आता लेखाकडे वळू. तुम्हाला मी आपलें मत सांगत नाहीं. दोन्ही बाजूचीं मतें तुमच्यापुढें ठेवतो व तुम्ही निःपक्षपातपणे आपलें मत

या. समग्र लेख वाचून एकंदरींत त्यांचा परिणाम वाचकांचे मनांत द्वेषबुद्धि किंवा शत्रुत्व हे मनोविकार उत्पन्न करण्याकडे झाला कीं नाहीं पाहा. वाचक वर्गहि मराठीच असला पाहिजे. या वाचकवर्गाच्या मनावर वर सांगितलेले परिणाम करण्याचा प्रयत्न आरोपीनें केला असें तुम्हांस खात्रीनें वाटत असेल तर आरोपीस दोषी ठरवा. परंतु तुमच्या मनांत या गोष्टीबद्दल संशय असेल किंवा आरोपीनें तसा प्रयत्न मुळींच केला नाहीं असें वाटत असेल तर आरोपीस निर्दोषी ठरविणें हें तुमचें कर्तव्य आहे. १५ मे १९०८च्या काळ पत्रांतील लेख तुम्ही पहा. या लेखाचे दोन भाग झाले आहेत. पहिल्या भागांत दोन पोटभाग आहेत. पूर्व बंगाल्यांत कांहीं पोलीस लोकांना बक्षिसें वांटल्या-बद्दल चर्चा केलेली आहे व मान्टोच्या संरक्षणासंबंधीं कांहीं नकाशांच्या गोष्टीविषयीं वर्णन केलें आहे. ह्या दोन गोष्टी एके ठिकाणीं सांगण्यामध्ये आरोपी म्हणतो त्याप्रमाणें त्याचा कांहीं वाईट हेतु नव्हता किंवा कसें याचा तुम्हीच विचार करा. मुझफरपुर येथें झालेल्या भयंकर प्रकारानंतर लवकरच हे लेख लिहिले आहेत. आरोपीनें आपल्या भाषणात या प्रकाराबद्दल जसे विचार प्रकट केले तसेच विचार अशिक्षित लेखांत आहेत कीं काय हें पहा. पोलीस अंमलदार लोकांना बक्षिसें वाटलीं ही गोष्ट सहज सांगितली गेली आहे किंवा तिचें निमित्त करून लोकांचे मनांत सरकारबद्दल तिरस्कार व अप्रीति उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला आहे हें पाहण्याचें काम तुमचें आहे. भयंकर गुन्हा करणाऱ्याचा पत्ता लावण्याबद्दल हीं बक्षिसें नेटिव्ह पोलिसांस दिली होतीं. गोऱ्या लोकांनीं गुन्हे शोधले असतां त्याच्या लोकांनाच बक्षिसें कां द्यावीं व तीं देण्यांत इतकी घाई कां करावी हा लेखांतील मुद्दा आहे. निव्वळ कबुलीजबाबानें गुन्हा शाबीत होत नसतो. बक्षिसें वांटण्याची घाई कां ? येथपर्यंत टीका बरोबर आहे. परंतु या खर्चास फाजील खर्च म्हटलें आहे हें बरोबर आहे किंवा काय हें तुम्ही पहा. पुढें हीं बक्षिसें देण्यांत सरकारचा गुप्त हेतु असावा असें ध्वनित केलें आहे त्याचा अर्थ काय ? बक्षिसें न्यून करणारांचा तमाम खावल्याबद्दल दिलीं असतां त्यांसंबंधीं विश्वासघाताचा उल्लेख कोणत्या हेतूनें केला आहे व बक्षिसें एकदम विश्वासघाताच्या सदरांत कशी जातात याचा विचार करा. विश्वासघात कोणचा हें कदाचित वाचकांचे लक्षांत येणार नाहीं म्हणून मान्टोचे नकाशेच भमून विकणाऱ्या विश्व म

ताचा उल्लेख केलेला आहे. गुन्ह्याचा तपास लावणें व आपल्या देशाच्या चावासंबंधाचे नकाशे शत्रूच्या स्वाधीन करणें यात फरक आहे. या दोन गोष्टी एका दर्जाच्या आहेत असें आरोपीनें ध्वनित केलें आहे. असें करण्यात आरोपी दोषी किंवा निर्दोषी आहे हें ठरविणें तुमचें काम आहे. या दोन बाबतींत तुमच्या मनात संशय असेल तर त्याचा फायदा तुम्हीं आरोपीस दिला पाहिजे. वर्तमानपत्राचें स्वातंत्र्य कमी करण्याची कोणाची इच्छा नाहीं. रंतु या गोष्टी एकत्र सांगून लोकांच्या मनात सरकारबद्दल तिरस्कार, द्वेष, अप्रीति वगैरे मनोविकार उत्पन्न करण्याचा प्रयत्न आरोपीनें केला असें म्हांस वाटत असल्यास त्यास दोषी ठरवा.

आता आपण लेखाच्या दुसऱ्या भागाकडे वळू. ( काही उतारे वाचून ाखवून ) बंगाल्यातील दोन निरपराधी बायांचे जे खून झाले त्याविषयीं हानुभूति दर्शविण्यासाठीं होणाऱ्या सभांचें यात वर्णन आहे. या खुनाबद्दल ोकांमध्ये खरोखर दुःख नसून दुःखाचा केवळ आविर्भाव आहे असा लेख लिहिण्याचा रोख आहे. एतद्देशीयांच्या मनामध्ये खरें दुःख नव्हतें असें णणें म्हणजे त्यांची विनाकारण बदनामी करणें होय. यापुढें मद्रासेस एका समानें केलेल्या भाषणातील अतिशय वाईट असा भाग उतरून घेतला आहे. ा भाग उतरून घेतला असला तथापि त्यातील मजकूर मुंबई इलाख्यात सिद्ध केल्याची जबाबदारी आरोपीवरच आहे. या मजकुरात 'स्वतंत्र राज्य' असे शब्द आहेत. स्वराज्याचा अर्थ कलकत्त्याच्या हायकोर्टात नेर्दोषी ठरलेला आहे. कलकत्त्यातील हायकोर्टात ठरलेला अर्थ आपण घ्या- याचा किंवा नाही हा प्रश्नच येथे उद्भवत नाहीं. कारण या ठिकाणीं 'स्वतंत्र राज्य' असे शब्द आहेत व **आरोपीचा अर्थ राष्ट्रीय स्वातंत्र्य म्हणजे रकीयांच्या अंमलांतून अजिबात निघणें असा आहे. ब्रिटिश ोकांना देशांतून हांकलून लावल्याशिवाय हें स्वराज्य कसें मिळाव ाचें याचा तुम्हीच विचार करा.** ही टीका योग्य आहे किंवा राजद्रोहात्मक ाहे याचा तुम्ही निर्णय करा. पुढें, हक्क मिळण्यासाठीं यत्न करण्याविषयीं लेख आहे. तेथें हक्काचा अर्थ काय हे सर्व लेख वाचून ठरवावयाचें आहे. ार शक्तीच्या परीक्षेसंबधीं लिहिलेलें आहे. ही शक्तीची परीक्षा कोणामध्यें व शासाठीं व केव्हा व्हावयाची ते पहा. आरोपीचा हेतु काय आहे हें दोन्ही

वाजूच्या प्रकाशित भाषणांवरून तुम्हीं ठरवावयाचें आहे. रशियांत बॉम्बच्या योगानें स्वराज्य मिळालें; मुंबईसहि आम्हास तें मिळालें पाहिजे. या ठिकाणी रशियाचा संबंध इतक्या स्पष्टपणें आणणें बरोबर होतें किंवा काय याचा विचार करा. समग्र लेखाचीं भाषांतरें तुमच्याजवळ आहेत; तीं काळजीपूर्वक वाचून त्याच्यावर इमानानें विचार करून उद्यां या. (ता. ८ जुलै १९०८ रोजी) आरोपीनें आपल्या भाषणांत एकदोन मराठी शब्दांच्या भाषांतराबद्दल हरकत घेतली आहे. भाषांतरावरून विचार केला तर मुळापेक्षां अंमळ कडक निघतो असें मलाहि वाटतें. सर्व लेख वाचूनच विचार करावा. आरोपीचे उद्देश ( Motives ) काय होते हे पहावयाचें सध्या आपलें काम नाहीं. लेखावरून सरकारविषयीं द्वेष, अप्रीति, राजद्रोह वगैरे मनोविकार लोकांच्या मनामध्यें उत्पन्न होतील किंवा नाहीं हे पहावयाचें आहे. हे मनोविकार कोणत्याहि मनुष्याच्या मनामध्यें असणें हा गुन्हा होत नाहीं; त्यांचा प्रसार करूं पाहणें हा गुन्हा आहे.

इतर लेख हे मुख्य जरी नसले तथापि आरोपीचा हेतु समजण्यासाठीं तुम्हीं त्यांचा उपयोग करावा. यांत तिनिवेल्लीच्या प्रकरणाचा उल्लेख आहे व आग लावणें, दंगा करणें याचें वर्णन आहे. सरकार आपल्या पोकळ सत्तेचें प्रदर्शन करीत आहे असा भावार्थ आहे. देशांत दुष्काळ पडतात त्याबद्दल सरकारास दोष दिला आहे. हे लेख विचारी लोकांच्या हातांत पडले तर कांहीं अपायकारक होणार नाहीं हें खरें, परंतु काळ पत्र हें पुष्कळ अशा लोकांच्या हातांत जातें व त्यांच्या मनावर या लेखांचा राजद्रोहकारक परिणाम होईल किंवा नाहीं याचा तुम्ही विचार करा. त्यांत बॉम्बचा उल्लेख आला आहे "इंग्रजांच्या सटक्या टोकर्यांतून" असले भयंकर शब्दप्रयोग आले आहेत एके ठिकाणीं तर "रक्तशोष करणारी जुलमी राज्यपद्धति" असें म्हटलें आहे. येवढ्या मोठ्या हिंदी प्रजेपुढें हे थोडेसे लोक काय करणार आहेत असें म्हटलें आहे. आरोपीचा हेतु [illegible] आपणाला आणखी [illegible] लेख दाखविण्यांत आले [illegible] त [illegible] याचा. त्यांमध्यें मि० हिडमन आणि मि० [illegible] [illegible] उतारे देण्यांत आले आहेत. [illegible] आणि [illegible] [illegible] सामनि[illegible] [illegible] फायदा होतो [illegible] नाहीं [illegible] हें स्पष्ट नाहीं